## खेड्यांतील शिक्षण

स्वातंत्र्यपूर्व काळांत शिक्षणाचा विचार करतांना तो नागरी दृष्टिकोनांतून केला जात असे. स्वातंत्र्योत्तर काळांत भारताच्या पुनर्रचनेच्या कार्यक्रमांत खेड्यांना जरूर तें महत्त्वाचें स्थान मिळालें आहे; अतएव भारताच्या शैक्षणिक पुनर्घटनेचा विचार करतांना, खेड्यांतील शाळा, त्यांचीं शिक्षणविषयक ध्येयें, त्यांचें कार्यक्षेत्र, त्यांच्या आर्थिक समस्या, तेथील शिक्षकांचें मार्गदर्शन, ह्या क्षेत्रांत परदेशांनीं केलेले प्रयोग इत्यादि प्रश्नांचा सर्वांगीण विचार करणें जरूर आहे. ह्या हेतूनें ‘ खेड्यांतील शिक्षण ’ ह्या नांवानें कांहीं पुस्तकें आम्ही प्रसिद्ध करण्याचें ठरविलें आहे. ‘ एक-शिक्षकी ’ शाळा हें त्यापैकीं पहिलें पुस्तक आहे. कव्हर पृ. ४ वर यानंतर प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांची यादी दिली आहे.

लेखक



खेड्यांतील शिक्षण :— १

# एक-शिक्षकी शाळा

●

लेखक

श्री. जे. पी. नाईक

श्री. व्ही. बी. कर्णिक

●

प्रथमावृत्ति १९५३

किंमत २ रुपये

# खेड्यांतील शिक्षण

स्वातंत्र्यपूर्व काळांत शिक्षणाचा विचार करतांना तो नागरी दृष्टिकोनांतून केला जात असे. स्वातंत्र्योत्तर काळांत भारताच्या पुनर्रचनेच्या कार्यक्रमांत खेड्यांना जरूर तें महत्त्वाचें स्थान मिळालें आहे; अतएव भारताच्या शैक्षणिक पुनर्घटनेचा विचार करतांना, खेड्यांतील शाळा, त्यांचीं शिक्षणविषयक ध्येयें, त्यांचें कार्यक्षेत्र, त्यांच्या आर्थिक समस्या, तेथील शिक्षकांचें मार्गदर्शन, ह्या क्षेत्रांत परदेशांनीं केलेले प्रयोग इत्यादि प्रश्नांचा सर्वांगीण विचार करणें जरूर आहे. ह्या हेतूनें ' खेड्यांतील शिक्षण ' ह्या नांवानें कांहीं पुस्तकें आम्हीं प्रसिद्ध करण्याचें ठरविलें आहे. ' एक-शिक्षकी ' शाळा हें त्यांपैकीं पहिलें पुस्तक आहे. कव्हर पृ. ४ वर यानंतर प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांची यादी दिली आहे.

लेखक





# एक-शिक्षकी शाळा

लेखक

श्री. जे. पी. नाईक

श्री. व्ही. बी. कर्णिक

प्रथमावृत्ति १९५३

किंमत २ रुपये

# आभार

The Single-Teacher School ह्या नांवाचें मूळ पुस्तक श्री. जे. पी. नाईक ह्यांनीं इंग्रजींत लिहिलें व तें भारत सरकारच्या मिनिस्ट्री ऑफ एज्युकेशननें प्रसिद्ध केलें.

सदरहू पुस्तकाचें मराठींत भाषांतर करण्याची परवानगी दिल्याबद्दल आम्ही मिनिस्ट्री ऑफ एज्युकेशन्–गव्हर्मेंट ऑफ इंडिया ह्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतों.

शांति निकेतन, ३१९ सोमवार, पुणें २.

जे. पी. नाईक
व्ही. बी. कर्णिक

मुद्रक
मा. र. कारले
जनसेवा मुद्रणालय,
१९२ शुक्रवार, पुणें २

प्रकाशक
स. आ. जगताप
जगताप–कारले प्रकाशन
३३१ शुक्रवार, पुणें २

# प्रस्तावना

श्री. जे. पी. नाईक यांच्या 'एक-शिक्षकी शाळा' या मराठी पुस्तकाला प्रास्ताविक चार शब्द लिहिण्यांत मला फार आनंद वाटत आहे. मूळ इंग्रेजी पुस्तक भारत सरकारनें नुकतेंच प्रसिद्ध केलें असून त्याचा मराठी अनुवाद प्रथम महाराष्ट्राला मिळत आहे. श्री. जे. पी. नाईक यांचा शिक्षण-क्षेत्रांतील अधिकार फार मोठा असून त्यांचें नांव भारतांत आतां सर्वत्र प्रसिद्ध झालें आहे. आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतही त्यांच्या नांवाचा प्रवेश नुकताच झालेला असून तेथेंही त्यांच्या नांवाला अधिकाधिक मान्यता मिळत जाईल अशीं चिन्हें दिसत आहेत. शिक्षण, ग्रामीण जीवन आणि सामाजिक नियोजन या तीन क्षेत्रांत श्री. जे. पी. नाईक यांनीं दीर्घ काल अध्ययन, चिंतन, प्रत्यक्ष प्रयोग आणि संशोधन केलेलें आहे. श्री. नाईक यांचें व्यक्तिमत्व विविध रंगांनीं नटलेलें आहे. कोल्हापूर येथें त्यांचें शिक्षण चाललें असतांनाच त्यांच्या तीव्र बुद्धिमत्तेची, अलौकिक स्मरणशक्तीची आणि विशाल व्यासंगाची कल्पना पुष्कळांना आली होती. गणित आणि साहित्य हे त्यांचे अध्ययनाचे विषय होते. इंग्रेजी साहित्याचा व्यासंग त्या काळांत त्यांनीं विशेष आस्थेनें केला होता. असा माणूस बहुधा इंग्रेजीचा प्राध्यापक होऊन एकाद्या महा-

विद्यालयांत गुंदून पडावयाचा ! पण श्री. नाईक यांना साहित्याबरोबरच जीवनाचेंही तीव्र आकर्षण भासत होतें. यामुळें गांधीजींच्या कायदेभंगाच्या विराट् आंदोलनांत ते साहजिकच ओढले गेले. कर्नाटक विभागांत चळवळ चालवीत असतां पकडले जाऊन बेल्लारीच्या तुरुंगांत बराच काळ काढण्याची संधि त्यांना मिळाली. त्या ठिकाणीं आपल्या देशांतील सामान्य जनतेची स्थिति काय आहे, याचें चित्र त्यांच्या डोळ्यापुढें स्पष्ट उभें राहिलें. तुरुंगांतील रुग्णालयांत त्यांनीं सेवा करतां करतां सामान्य औषधोपचाराचें ज्ञान संपादन केलें, आणि तुरुंगांतून बाहेर पडल्यावर खेड्यांतील जनतेची स्थिति सुधारण्यासाठीं धारवाड जिल्ह्यांतील कांहीं खेड्यांत वर्षानुवर्षें काम केलें. त्या वेळीं ग्रामीण जीवनांतील नानाविध प्रश्नांचा त्यांनीं बारकाईनें अभ्यास केला.

शिक्षण, आरोग्य आणि आर्थिक विकास हे आपल्या खेड्याचे प्रमुख प्रश्न आहेत. या साऱ्याच प्रश्नांचा परस्परांशीं संबंध अगदीं निगडित झालेला आहे. खेड्यांतील शिक्षणाचा श्री. नाईक यांनीं आठ-नऊ वर्षें स्वतः प्रयोग चालविला होता. ४०-४२ च्या स्वातंत्र्याच्या चळवळीमुळें श्री. नाईक यांचा तो प्रयोग खंडित झाला आणि परिस्थितीवशात् एक नवें क्षेत्र श्री. नाईक यांना उपलब्ध झालें. कोल्हापूर येथें शिक्षण व नियोजन या क्षेत्रांत काम करण्याची मोठी अमोल संधि श्री. नाईक यांना मिळाली. नव्या राजकीय परिवर्तनां-



मुळें कोल्हापुरांतील हें कामही अपुरेंच राहिलें. यानंतर श्री. नाईक यांनीं श्री. रामभाऊ परुळेकर या थोर शिक्षण-शास्त्रज्ञांच्या सहकार्यानें मुंबई येथें शैक्षणिक क्षेत्रांत उच्च संशोधन व अध्यापन करणारी एक शिक्षणसंस्था निर्माण केली आणि त्यानंतर डॉ. गावडे यांच्या सहकार्यानें गारगोटी ( जि० कोल्हापूर ) येथें 'श्री मौनी' विद्यापीठ या नांवाची ग्रामीण शिक्षणाचा व्यापक प्रयोग करणारी एक थोर शिक्षण संस्था स्थापन केली. महाराष्ट्रांतील थोर शिक्षणशास्त्रज्ञांच्या सहकार्यानें श्री. नाईक यांनीं या वर्षी ' भारतीय शिक्षा-विचार मंडळ ' नांवाची आणखी एक संस्था उभारली आहे. शिवाय, अलीकडे भारतीय शिक्षण-विषयक विविध प्रश्नांवर वेगवेगळे ग्रंथ लिहिण्याचें काम त्यांनीं हातीं घेतलें आहे. असे तीनचार ग्रंथ आतांपर्यंत त्यांनीं तयार करून दिले आहेत; आणि आणखीही कित्येक ग्रंथ लिहिण्याची त्यांची योजना झालेली आहे. अशा थोर अधिकारी पुरुषाच्या लेखणींतून उतरलेल्या पुस्तकाचा हा अनुवाद महाराष्ट्राला प्रथम मिळावा हें महाराष्ट्राचें भाग्यच समजलें पाहिजे.

श्री. कर्णिक हे अनुभवी शिक्षक असून सध्यां महाराष्ट्रांत लोकशिक्षणाचें काम करीत आहेत. त्यांनीं अनुवादाचें काम अतिशय कळकळीनें आणि तन्मयतेनें केलें असल्यामुळें तें

अतिशय सरस उतरलें आहे, हें निराळें सांगण्याची गरज नाहीं

राजकीय स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर आपल्या समाजापुढें मुख्य प्रश्न आहे तो जनता-विकासाचा. भारतीय जनता ही प्रामुख्यानें ग्रामीण विभागांतच राहणारी आहे. यामुळें जनता-विकासाचा प्रश्न हा ग्रामीण विकासाचा प्रश्न झाला आहे. शिक्षण, आरोग्य आणि आर्थिक विकास हेच ग्रामीण जीवनाचे मुख्य प्रश्न आहेत. शिक्षण हें केवळ पुस्तकी स्वरूपाचें झाल्यानें जीवनाशीं त्याचा विरोध निर्माण झाला आहे. भारतीय जीवनांत नवा आशावाद निर्माण करावयाचा असेल, जनतेंत नवा उत्साह संचरावा असें वाटत असेल, तर शिक्षणानें जीवनाचें समग्र मार्गदर्शन करण्याची जबाबदारी घेण्यास पुढें आलें पाहिजे. प्राथमिक शिक्षण हेंच खरें राष्ट्रीय शिक्षण झाल्याशिवाय या देशांतील जनतेचा प्रश्न सुटणार नाहीं. आपल्याकडील शिक्षणशास्त्रज्ञांचें, विद्यापीठांचें व शैक्षणिक संशोधकांचें प्राथमिक शिक्षणाकडे अजून विशेष लक्ष गेलेलें नाहीं. प्राथमिक शिक्षण आणि प्राथमिक शिक्षक हे अद्यापि उपेक्षेचा विषय राहिलेले आहेत. ही परिस्थिति पालटण्यासाठीं जोराचे प्रयत्न झाले पाहिजेत. श्री. नाईक यांच्या ग्रंथमालेनें तज्ज्ञांचें लक्ष या उपेक्षित विषयाकडे खेंचलें जाईल, अशी मला आशा आहे.



प्राथमिक शिक्षकाचें समाजांतील स्थान सन्माननीय बनविण्यासाठीं देखील खास प्रयत्नांची जरूर आहे. आमच्या प्राथमिक शिक्षकांना सर्व बाजूंनीं सुशिक्षित करण्याची फार आवश्यकता आहे. श्री. नाईक यांच्या पुस्तकांनीं प्राथमिक शिक्षकांना फार मोठा लाभ होणार आहे, असें मी मानतों.

महाराष्ट्राच्या नव्या संघटनेंत प्राथमिक शिक्षणाला महत्त्वाचें स्थान लाभणार आहे. श्री. नाईक यांचे ग्रंथ योग्य वेळींच महाराष्ट्रांत येत आहेत. महाराष्ट्रांतील सर्व शिक्षण-प्रेमी लोक या ग्रंथांचें उत्साहानें स्वागत करतील अशी माझी खात्री आहे.

कळवण
८ ऑक्टो. ५३
( भाऊबीज )

—स. ज. भागवत

# प्रकाशकांचे दोन शब्द

आपला देश स्वतंत्र झाला, त्यास आतां सहा वर्षे पूर्ण झालीं. ह्या देशाची आर्थिक व सामाजिक पुनर्रचना करण्याचें काम आपल्या पुढाऱ्यांनीं आतां हातीं घेतलें आहे. भारताची सुधारणा, म्हणजेच भारतांतील पांच लाख खेड्यांची सुधारणा. खेड्यांची सुधारणा करण्याचा एक मुख्य मार्ग म्हणजे खेड्यांत देण्यांत येणाऱ्या शिक्षणाची सुधारणा करणें. खेड्यांतील जनतेला योग्य असें प्रभावी शिक्षण जर खेड्यांतील जनतेला मिळालें तरच आजचीं खेडीं सुधारतील हा सिद्धांत लक्षांत घेऊन 'खेडयांतील शिक्षण' ह्या विषयावर कांहीं पुस्तकें इंग्रजींत लिहिण्याचें श्री. जे. पी. नाईक ह्यांनीं ठरविलें आहे. श्री. नाईक हे एक ख्यातनाम शिक्षणतज्ज्ञ आहेत. प्राथमिक शिक्षणाच्या क्षेत्रांत त्यांचा अधिकार फार मोठा आहे. त्यांच्या पुस्तकांचीं मराठींत भाषांतरें करण्याचें काम श्री. व्ही. बी. कार्णिक करणार आहेत. श्री. कार्णिक हे शिक्षणक्षेत्रांत जवळ जवळ दोन तपें काम करीत आहेत. आपल्या आयुष्याचीं वीस वर्षे त्यांनीं ग्रामीण जनतेच्या शिक्षणासाठीं खर्चिलीं आहेत. ह्या दोघांच्या सहकार्यानें तयार होणारीं पुस्तकें महाराष्ट्राला निश्चितच मोलाचीं वाटतील. ह्या मालेपैकीं 'एक शिक्षकी शाळा' हें पहिलें पुस्तक प्रकाशित करण्याचा सुयोग



आज प्राप्त होत असल्याबद्दल आम्हांला साभिमान आनंद वाटत आहे.

ह्या पुस्तकाला प्रस्तावना लिहून देण्याची विनंती आम्हीं आचार्य भागवत यांना केली. त्यांच्यामागें अनेक कामांचा ससेमिरा असतांना सुद्धां, त्यांनीं ही विनंती मान्य केल्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी आहोंत. ह्या पुस्तकासाठीं योग्य असें चित्र काढून दिल्याबद्दल, चित्रकार श्री. दीक्षित ह्यांचे पण आम्ही आभारी आहोंत. मुद्रितें तपासण्यासाठीं व पुस्तकाची लौकर प्रसिद्धि व्हावी म्हणून आमचे मित्र श्री. शंकरराव थोरात ह्यांनीं केलेल्या मदतीचा पण आम्ही कृतज्ञतापूर्वक उल्लेख करीत आहोंत.

पुस्तकाची किंमत शक्यतों कमी ठेवण्याचा आमचा विचार असतो; परंतु प्रस्तुत पुस्तकासाठीं फारच भारी किंमतीचा कागद वापरल्यामुळें नाइलाजानें पुस्तकाची किंमत दोन रुपये ठेवणें भाग पडत आहे. महाराष्ट्रांतील शिक्षणक्षेत्रांत काम करणारे सर्व रसिक ह्या पुस्तकाचें व ह्या मालेंतील ह्यानंतर प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांचें यथोचित स्वागत करतील अशी आशा व्यक्त करून, आम्हांला जनसेवेची संधि दिल्याबद्दल लेखकद्वयांचे आभार मानून हे दोन शब्द पुरे करतों.

—प्रकाशक

———

"सार्वत्रिक शिक्षणाची तरतूद करण्याचें उद्दिष्ट आमच्या घटनेंत जाहीर करण्यांत आलें आहे. प्रस्तुत ग्रंथकर्त्याचें मत असें आहे कीं, आपल्या देशांतील बहुसंख्य खेड्यांना एक-शिक्षकी शाळाच परवडणार आहेत. घटनेंतील आपलें उद्दिष्ट जर साधावयाचें असेल तर ह्या 'एक-शिक्षकी' शाळांची नीट जोपासना व्हायला पाहिजे व शास्त्रीय पद्धतीनें त्यांचा योग्य तो विकास घडवून आणला पाहिजे."

—हुमायून कबीर

सेक्रेटरी, मिनिस्ट्री ऑफ एज्युकेशन,
गव्हर्मेंट ऑफ इंडिया, न्यू दिल्ली.

## श्री. हुमायून कबीर ह्यांचा पुरस्कार

स्वराज्य प्राप्त झाल्यापासून आपल्या शिक्षणविषयक प्रश्नांमध्यें, लोक वाढत्या प्रमाणांत लक्ष घालूं लागले आहेत. पूर्वीच्या शिक्षणपद्धतींत जे दोष होते, ते काढून टाकण्यासाठीं कोणते प्रयत्न केले जात आहेत, हें जाणून घेण्याची उत्कंठा शिक्षणक्षेत्रांत कार्य करणाऱ्यांना लागून राहिली आहे. लोकशाही राज्यपद्धतीमध्यें जनतेवर पडणारी जबाबदारी उचलण्याची पात्रता लोकांमध्यें निर्माण करण्यासाठीं भारत कशा रीतीनें पावलें टाकणार आहे, हें जाणून घेण्यास प्रांतिक सरकारें, खाजगी संस्था व शिक्षणतज्ज्ञ उत्सुक आहेत. आमच्या देशांत व परदेशांत जे शहाणे लोक आहेत, त्यांचा असा विश्वास आहे कीं, आमच्या देशांतील दारिद्र्य, रोगराई व निकृष्ट जीवनमान ह्यांचा नायनाट करण्यासाठीं ह्या देशांत योग्य अशा शिक्षणपद्धतीची जोपासना करावी लागेल. आपल्या पद्धतीचा ह्या प्रकारें विकास व्हावा असें जर आपणांस वाटत असेल तर आपण शिक्षणक्षेत्रांत आजपर्यंत जें कार्य केलें त्याचें योग्यप्रकारें मूल्यमापन आपणांस करावें लागेल व परदेशांत रूढ असलेल्या शिक्षणपद्धतींच्या बरोबर आपल्या कामाची तुलना करावी लागेल.

ह्या राष्ट्रीय उपक्रमाला हातभार लावण्याच्या हेतूनें मध्यवर्ति सरकारनें शिक्षणविषयक वेगवेगळ्या प्रश्नांवर प्रकाश

टाकणारीं छोटीं छोटीं पुस्तकें प्रसिद्ध करण्याची एक योजना आंखली आहे. ह्या योजनेप्रमाणें शिक्षणक्षेत्रांत कार्य करणारे जे अनुभवी तज्ज्ञ व शिक्षक आहेत त्यांना ह्या देशांतील प्रचलित शिक्षणविषयक कार्यक्रमांचा व मूलभूत शिक्षणविषयक प्रमेयांची पाहणी करण्यास आवाहन करण्याचें ठरविलें आहे व त्यांच्या ज्ञानाचा आणि अनुभवाचा ह्या कामीं फायदा घेण्याचें पण ठरविलें आहे. आपल्या अनुभवावर व ज्ञानावर आधारलेली ही माहिती, हे लेखक, आमच्या देशांतील शिक्षण-क्षेत्रांत कार्य करणाऱ्यांना व परदेशांतील लोकांना पण पुरवतील आणि त्यांना आमच्या देशांत शिक्षणपद्धतीचा विकास कसा होणार आहे, तसेंच त्यासाठीं योजना कोणत्या आंखल्या जाणार आहेत, ह्याची पण कल्पना देतील.

प्रस्तुत, ' एक-शिक्षकी शाळा ' हें पुस्तक, ह्या उपक्रमांतीलच एक भाग आहे. ग्रंथकर्त्यांनीं ह्या 'एक-शिक्षकी' शाळांचा इतिहास सांगितला आहे व देशाच्या आजच्या परिस्थितींत त्याचें किती महत्त्व आहे, तें समजावून सांगितलें आहे. त्यांनीं असें दाखवून दिलें आहे कीं, फार पूर्वकालापासून ह्या देशांत 'एक-शिक्षकी' शाळा चालू आहेत व ह्या देशांतील लोकवस्ती खेड्याखेड्यांतून विखुरलेली असल्यामुळें ह्या अशा 'एक-शिक्षकी' शाळा, देशांतील शिक्षणपद्धतीचा एक अविभाज्य घटक म्हणून एथें कायमचें वास्तव्य करून राहणार आहेत. ज्याअर्थी ह्या शाळा एथें स्थिर राहणार



आहेत, त्याअर्थीं ह्या शाळांचा नीट अभ्यास केला पाहिजे व त्यांची कार्यक्षमता वाढवून त्यांचा दर्जा पण सुधारला पाहिजे. प्रस्तुत ग्रंथकर्त्यांनीं अमेरिका, स्वीडन, ऑस्ट्रेलिया वगैरे देशांत ह्या शाळांबाबत आलेला अनुभव जनतेपुढें मांडला आहे आणि त्या दृष्टीनें ह्या शाळांची व्यवस्था पाहण्याबाबत व त्यांची शैक्षणिक उपयुक्तता वाढविण्याबाबत सूचना केल्या आहेत. योग्य मार्गदर्शनाखालीं, ह्या प्रायोगिक 'एक-शिक्षकी' शाळांची संघटना करण्याचें महत्त्व त्यांनीं स्पष्ट करून सांगितलें आहे; कारण त्यायोगें ह्या शाळांतील शिक्षण-विषयक तंत्रामध्यें व त्यांच्या व्यवस्थेमध्यें योग्य तो फेरबदल घडवून आणतां येईल.

सार्वत्रिक मूलोद्योगी शिक्षणाची तरतूद करण्याचें उद्दिष्ट आमच्या घटनेमध्यें जाहीर करण्यांत आलें आहे. प्रस्तुत ग्रंथकर्त्यांचें मत असें आहे कीं, आपल्या देशांतील बहुसंख्य खेड्यांना 'एक-शिक्षकी' शाळाच परवडणार आहेत. घटनेंतील आपलें उद्दिष्ट जर साधावयाचें असेल तर ह्या 'एक-शिक्षकी' शाळांची नीट जोपासना व्हायला पाहिजे व शास्त्रीय पद्धतीनें त्यांचा योग्य तो विकास घडवून आणला पाहिजे. अतएव आमच्या शैक्षणिक पुनर्घटनेच्या कार्यक्रमांत ह्या 'एक-शिक्षकी' शाळांच्या संभाव्य उपयुक्ततेची नीट छाननी करण्याच्या उपक्रमाला अग्रस्थान मिळालें पाहिजे. असा अभ्यास करण्याला ह्या पुस्तकाची मौलिक मदत होईल, असा विश्वास आहे.

———

## ह्या पुस्तकांत

- एक शिक्षकी शाळांची ऐतिहासिक पार्श्वभूमि —ही एक भारतीय परंपरा.
- परदेशांतील एक शिक्षकी शाळा.
- वर्गांचें एकीकरण व शाळांचें केंद्रीकरण.
- ह्या शाळांच्या अडचणी.
- त्यांचे कारभारविषयक व शैक्षणिक प्रश्न— शिक्षकांच्या बदल्या व नेमणुकांचें धोरण. ह्या शाळांची देखरेख. त्यांचें वेळापत्रक वर्गनायक पद्धतीचे फायदे. दुवक्त पद्धतीनें होणारी सोय. अभ्यासक्रमाचें धोरण.
- संशोधनाची गरज.

इ. इ. मुद्यांवर चर्चा केली आहे.

# : १ :

## ऐतिहासिक पार्श्वभूमि

'एक-शिक्षकी' शाळा आमच्या शिक्षणपद्धतींतील एक जुनी परंपरा आहे. वेदकाळांत शिक्षण ही एक कौटुंबिक बाब होती. प्रत्येक बाप आपल्या मुलाला स्वतंत्रपणें वेदविद्या व आपल्या ज्ञातीचे आचार शिकवीत असे. ही कौटुंबिक शिक्षण-पद्धति, ह्या देशांत १९ व्या शतकाच्या मध्यापर्यंत चालू होती. बंगालमध्यें ही पद्धति सर्रास चालू असल्याचा उल्लेख ॲडमनें केला आहे. त्यानें केलेल्या पाहणींत त्याला असें आढळून आलें कीं, बंगाल व बिहारमधील ज्या भागांची त्यानें सूक्ष्म रीतीनें पाहणी केली, त्या भागांत ह्या कौटुम्बिक शाळा १७४७ होत्या; तर ज्यांना शाळा म्हणून संबोधता येईल, अशा संस्था फक्त ३७ होत्या. मन्रोला मद्रासमध्यें असें आढळून आलें कीं, शाळेंत शिक्षण घेणाऱ्या प्रत्येक मुलामागें कौटुम्बिक शाळेंत शिकणारीं पांच मुलें होतीं. कॅनराच्या कलेक्टरानें असें नमूद केलें आहे कीं, जिल्ह्यामध्यें इतकीं मुलें घरीं आपल्या वडिलांजवळ व नातेवाईकांजवळ शिक्षण घेत आहेत कीं, त्यामुळें ह्या जिल्ह्यांतील किती मुलें शिक्षण घेत आहेत व शाळांची संख्या किती आहे, हें

निश्चितपणें सांगणें कठीण आहे; इतकेंच नव्हे तर जी माहिती पुरविली जाईल ती चुकीची ठरण्याचाच जास्त संभव आहे. अशाप्रकारच्या शिक्षणपद्धतीचा उल्लेख करणारे उतारे सरकारी कागदपत्रांतून जरी फारसे आढळले नाहींत तरी अशी कौटुम्बिक शिक्षणपद्धति देशांतील निरनिराळ्या भागांतून प्रचलित होती हें सिद्ध करण्यास भरपूर पुरावा उपलब्ध आहे. हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, हीं जीं कौटुम्बिक शिक्षण-केंद्रें होतीं तीं सर्व केंद्रें म्हणजे 'एक-शिक्षकी' शाळाच होत्या.

त्यानंतर पुढें जेव्हां श्रमविभागाच्या तत्त्वावर समाजाची उभारणी होऊं लागली, तेव्हां ह्या कौटुम्बिक शिक्षणपद्धतीची पीछेहाट सुरू झाली व धंदेवाईक शिक्षकांनीं चालविलेल्या 'शाळा' अस्तित्वांत येऊं लागल्या. परंतु ही एक-शिक्षकी' शाळा चालविण्याची परंपरा एथें इतकी खोल रुजली होती कीं, सर्वसाधारण शिक्षकांनीं हीं आपलीं केंद्रें एकत्र करून त्यांना विद्यालयाचें स्थान प्राप्त करून देण्याऐवजीं, त्यांनीं आपापलीं केंद्रें तशींच चालू ठेविलीं. प्राचीन भारतांत तक्षशिला ह्या नांवाचें एक महत्त्वाचें विद्या मिळविण्याचें स्थान होतें. त्या ठिकाणीं उत्तर भारतांतील वेगवेगळ्या ठिकाणचे विद्यार्थी उच्च शिक्षणासाठीं जमा होत; परंतु ह्या ठिकाणीं सुद्धां एकादें कॉलेज किंवा विश्वविद्यालय जन्माला येऊं शकलें नाहीं. प्रत्येक शिक्षक आपली स्वतंत्र संस्था चालवीत होता. व ह्या कामीं त्यांचे पुढारलेले विद्यार्थी त्यांना मदत करीत



होते. काशी (बनारस) हें २००० वर्षांपासून शिक्षणाचें एक नाणावलेलें केंद्र होतें. ह्या ठिकाणीं भारतांतील निरनिराळ्या ठिकाणांहून शेंकडों विद्यार्थी अभ्यासासाठीं येत असत; परंतु एथेंसुद्धां प्रत्येक शिक्षक शाळा स्वतंत्रपणें चालवीत असे. ह्या शाळांतील शिक्षकाजवळ ४ ते ५ विद्यार्थी शिक्षण घेत. जे प्रसिद्ध शिक्षक होते त्यांच्याकडे १२ ते १५ विद्यार्थी असत; परंतु ह्यापेक्षां मोठ्या संख्येनें कोणाकडेही विद्यार्थी नसत.

ब्रिटिश राजवट सुरू होण्यापूर्वीं या देशांत जी एतद्देशीय शिक्षणपद्धति प्रचलित होती त्या पद्धतींत पण 'एक शिक्षकी' शाळाच प्रामुख्यानें दिसत होत्या. ॲडमला असें दिसून आलें कीं, बहुतेक हिंदी शाळा ह्या 'एक-शिक्षकी' शाळा होत्या व या शाळांबद्दल लिहितांना तो म्हणाला, "एथील शिक्षकांची संख्या व शाळांची संख्या सारखीच आहे." ह्यावेळीं मुंबई व मद्रास एथें चालू असलेल्या शाळांच्याबाबत केलेल्या चौकशींत हेंच आढळून आलें कीं, या ठिकाणच्या बहुसंख्य शाळा, ह्या 'एक-शिक्षकी' शाळाच होत्या. यावरून असें अनुमान काढतां येईल कीं, त्या काळच्या भारतांतील सर्व भागांत चालू असलेल्या सर्वसाधारण शाळा या 'एक-शिक्षकी' शाळाच होत्या.

वर दिलेल्या माहितीवरून हें स्पष्ट दिसून येईल कीं वेदकालापासून भारतामध्यें 'एक-शिक्षकी' शाळा अस्तित्वांत

आहेत व कांहीं तुरळक बहुशिक्षकी शाळांचे अपवाद वगळले तर ह्याच 'एक-शिक्षकी' शाळांनीं भारतांतील सर्व शिक्षण-क्षेत्र व्यापून टाकलेलें दिसतें.

ह्या 'एक-शिक्षकी' शाळा अस्तित्वांत येण्याचें कारण म्हणजे ह्या देशांत प्रचलित असलेली एक विशिष्ट प्रकारची सामाजिक परिस्थिति. शिक्षण घेणाऱ्या मुलाची संख्या इतकी अल्प असे कीं, 'एक-शिक्षकी' शाळांखेरीज इतर प्रकारच्या शाळां निघूं शकतच नव्हत्या. प्रत्येक कुटुंबाचा एकाद्या विशिष्ट शिक्षकाच्या कुटुंबाशीं घरोब्याचा संबंध असे. हा संबंध पिढ्यानुपिढ्या चालत आलेला असे. ज्याप्रमाणें प्रत्येक पिढीचा परंपरागत असा एकादा उपाध्याय असे, तसाच त्यांचा शिक्षक पण असे. त्यामुळें मोठ्या गांवांतून जरी पुष्कळ मुलांना एके ठिकाणीं जमवून त्यांची एकत्र शिक्षणाची सोय करणें शक्य होतें तरी ही विशिष्ट परंपरा आड येत होती. त्यामुळें कोणत्याही ठिकाणीं बहुशिक्षकी शाळा जन्माला येऊं शकल्या नाहींत; 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या मात्र वाढत असे.

ह्या 'एक-शिक्षकी' शाळा वाढीला लागण्यास शिक्षण-शास्त्रांतील एक सिद्धांत पण जबाबदार होता. असें मानलें जात होतें कीं, शिक्षण चांगलें होण्यास गुरुशिष्यांचे संबंध अगदीं घनिष्ट असले पाहिजेत. ('बहुशिक्षकी' शाळां पेक्षां 'एक-शिक्षकी' शाळांतून हें उद्दिष्ट चांगलें साधलें जाई.) ह्या शाळांच्या वाढीला आणखी एक गोष्ट जबाबदार होती.



आमच्या लोकांना सहकारी पद्धतीनें कामें करण्याची संवय नव्हती. स्वतंत्रपणें कामें करणें त्यांना आवडे. कांहीं जरी कारणें असलीं तरी ह्या 'एक-शिक्षकी' शाळांपासून जसे कांहीं फायदे होत होते तसे कांहीं तोटे पण होते. ह्या 'एक-शिक्षकी' शाळांमुळें मोठमोठ्या संस्था जन्माला येऊं शकत नव्हत्या. कॉलेजें व विश्वविद्यालयें पण अस्तित्वांत येऊं शकत नव्हतीं. उलटपक्षीं ह्या 'एक-शिक्षकी' शाळांचा तिहेरी फायदा होत होता. शिक्षक व विद्यार्थी ह्यांचे संबंध दृढतर होत होते. वर्गांत मुलांची संख्या कमी असल्यामुळें विद्यार्थ्यांकडे वैयक्तिक लक्ष पुरविणें शक्य होत होतें व विद्यार्थ्यांच्या मदतीनें शाळा चालविण्याची पद्धति रूढ होत होती.

आधुनिक युगाला प्रारंभ होईपर्यंत ह्या 'एक-शिक्षकी' शाळांचीं हीं शिक्षणविषयक मूल्यें जोपासलीं गेलीं होतीं व ब्रिटिश राजवटीला प्रारंभ होण्यापूर्वींच्या एतद्देशीय शिक्षण-संस्थांचें वैशिष्ट्य म्हणून ह्या गोष्टींचा निर्देश केला जात होता. ह्या शिक्षणपद्धतींत शिक्षक व विद्यार्थी ह्यांचे संबंध घरोब्याचे व घनिष्ट असे होते. त्या काळीं प्राथमिक शाळांतून विद्यार्थ्यांना जरी कडक शिक्षा करण्यांत येत होती, तरी ह्या गुरु-शिष्यांच्या संबंधांत त्यामुळें कोणताही बिघाड होऊं शकत नव्हता. शाळांमधील मुलांची संख्या पण मर्यादित होती. ही शाळांची सरासरी मुंबईत २५, गुजरायेंत २०, कोंकणांत व प्रांतांतील इतर ठिकाणीं १५, ह्याप्रमाणें होती. ॲडॅमला पण

त्याच्या पाहणींत हेंच आढळून आलें. त्यानें २५६७ शाळा पाहिल्या व ह्या शाळांतून ३०९१५ मुलें शिक्षण घेत असल्याचें त्याला दिसून आलें. म्हणजे सरासरी एका शाळेंत १२ मुलें शिक्षण घेत असल्याचें त्याला आढळून आलें. ही परिस्थिति त्या काळीं भारतांत सर्वत्र प्रचलित होती. एका शिक्षकाला फारच थोडीं मुलें सांभाळावीं लागल्यामुळें त्यांच्याकडे वैयक्तिक लक्ष देणें शिक्षकाला शक्य होत होतें. औद्योगिक क्रांतीनंतर कोणत्याही वस्तूचें मोठ्या प्रमाणांत उत्पादन होण्याला प्रारंभ झाला. ज्याला आपण शाळेंतील वर्ग म्हणतों, तोही ह्याच काळापासून जन्माला आला; कारण ह्या ठिकाणीं मोठ्या संख्येनें विद्यार्थ्यांना शिक्षण देण्याची सोय होत होती. ही वर्गपद्धति त्याकाळीं अस्तित्वांत आली नव्हती. त्या काळीं प्रत्येक विद्यार्थी म्हणजे एक संस्थाच होती. विद्यार्थी वर्षांतील वाटेल त्या महिन्यांत शाळेंत येऊं शकत होता, वयाची अट नव्हती. पुष्कळदां तर त्याला शिकविण्याचा अभ्यासक्रम पण तो शाळेंत येतांना बरोबर आणीत असे; कारण आपल्या मुलानें काय शिकावें हें बहुधा त्याचे पालक ठरवीत. त्याच्या गरजेप्रमाणें व अभ्यासांतील त्याच्या प्रगतीप्रमाणें त्याला शिक्षण मिळत असे. दुसऱ्या मुलांची अभ्यासाची तयारी झाली कीं नाहीं, ह्याचा विचारसुद्धां न करतां त्याला पुढला अभ्यास शिकविण्याची सोय होत होती. तसेंच त्याला जें शिकावयाचें होतें तें शिकून झाल्यावर अथवा शिक्षकाला जें शिकवायचें होतें तें



शिकवून झाल्यावर, केव्हांही शाळा सोडण्याची त्याला मुभा होती. आधुनिक शिक्षणपद्धतींत ह्या व्यक्तिगत शिक्षण देण्याच्या पद्धतीला खो देण्यांत आला. त्याऐवजीं सबंध वर्गाला शिकविण्याची प्रथा जन्माला आली. ह्या वर्गपद्धतीनें शिक्षण देण्यामधील दोष आतां लक्षांत येऊं लागले आहेत व त्यामुळें ही वर्गपद्धति रद्द करून पूर्वीप्रमाणेंच व्यक्तिगत शिक्षण देण्याच्या पद्धतीचाच स्वीकार करण्याची उत्कंठा दिसून येऊं लागली आहे. हें जर शक्य नसेल तर एका शिक्षकामागें मुलांची संख्या कमी करून, वर्ग लहान करणें जरूरीचें वाटूं लागलें आहे. ह्यायोगें शिकविण्याची वर्गपद्धति पण स्वीकारली जाईल व व्यक्तिगत लक्ष पण पुरविलें जाईल. जे लोक जुन्या एतद्देशीय शिक्षणपद्धतीवर टीका करतात, त्यांनीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, त्या शिक्षणपद्धतींत कांहीं असे विशेष गुण असत कीं, जे आजच्या प्रगतिपथावर असलेल्या संस्थांतूनसुद्धां आढळून येत नाहींत.

'एक-शिक्षकी' शाळेच्या मुख्याध्यापकाला एका वेळीं ४–५ वर्ग सांभाळावे लागतात व पुष्कळांना तें काम अवघड अथवा अशक्य वाटतें; परंतु आपण हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, आपल्या पूर्वींच्या शिक्षकांना ह्यापेक्षां कठीण अशीं कामें करावीं लागत. त्याकाळीं जरी एका शिक्षकाला १५ विद्यार्थी सांभाळावे लागत, तरी ते १५ विद्यार्थी म्हणजे १५ स्वतंत्र वर्गच होते; कारण प्रत्येक विद्यार्थी हा प्रग-

तीच्या वेगवेगळ्या पायरीवर उभा असे. ह्या अवस्थेंतून मार्ग काढण्याची एक अभिनव पद्धति त्यांनीं शोधून काढली. शिक्षकांना मदत करण्याचें काम वर्गनायकाकडे (मॉनिटर-कडे) सोपविण्यांत येऊं लागलें. ह्या योजनेप्रमाणें वर्गातील ज्येष्ठ विद्यार्थ्यांना आपल्या वर्गातील कनिष्ठ विद्यार्थ्यांना शिकविण्याचें काम करावें लागे. हें काम त्यांना दिवसांतील थोडा वेळ करावें लागे. शिक्षक कांहीं विद्यार्थ्यांना क्रमा-क्रमानें शिकवी अथवा त्यांना गटागटानें शिकवी व बाकीच्या विद्यार्थ्यांना कांहीं अभ्यास करायला देऊन कामांत गुंतवी अथवा वर्गनायकांना त्यांना शिकवायला लावीत असे. हें काम करण्याच्या वेगवेगळ्या पद्धति अस्तित्वांत होत्या. पण त्यांपैकीं एक अभिनव पद्धति म्हणचे मुलांच्या जोड्या लावणें ही होय. १८१७ सालीं बॉम्बे एज्युकेशन सोसायटीनें प्रसिद्ध केलेल्या अहवालांत ह्याविषयीं लिहितांना पुढील उल्लेख केला आहे—" हिंदु शाळांचें वैशिष्टय म्हणजे विद्या-र्थ्यांनींच परस्परांना शिक्षण देण्याची त्या शाळांतून चालू असलेली योजना. ज्यावेळीं मुलाला शाळेंत घालण्यांत येतें, ( मुलींना शाळेंत घालण्याची व त्यांना लिहायला, वाचा-यला शिकविण्याची एथें पद्धत नाहीं. ) त्यावेळीं त्याला जास्त शिकलेल्या एकाद्या विद्यार्थ्याकडे सोंपविण्यांत येतें. त्या विद्यार्थ्यानें नव्या मुलाला धडे द्यावयाचे, शिकण्यामध्यें त्याला हरएक प्रकारची मदत करावयाची व त्याच्या वर्तणुकीबद्दल



व त्याच्या प्रगतीबद्दल शिक्षकांकडे वरचेवर माहिती द्यावयाची असे. शाळेंत येणाऱ्या विद्यार्थ्याला एका वर्गांत घालण्यांत येत नसे; त्याला एखादा जोडीदार देण्यांत येत असे. विद्यार्थी व त्याचा शिक्षक, अशा जोड्या लावण्यांत येत असत. शाळेंत बसण्याची पद्धति पण अशी होती कीं, ज्याला कमी येत असे, त्याला त्याच्यापेक्षां अधिक येणाऱ्याच्या शेजारीं बस-विण्यांत येई व त्याच्यापासून तो धडे घेई व मदत मिळवी. ज्यावेळीं ज्येष्ठ मुलांपैकीं पुष्कळांची सारखी प्रगति होई, त्यावेळीं त्यांना एके ठिकाणीं एकाच रांगेंत बसविण्यांत येई व त्यांना शिकविण्याचें काम प्रत्यक्ष शिक्षक करीत. ह्या पद्धती-मुळें शिक्षकाला शाळेवर देखरेख ठेवायला भरपूर वेळ मिळे; इतकेंच नव्हे तर प्रत्येक विद्यार्थ्याची अभ्यासांत प्रगति किती झाली हें पण त्याला पडताळून पाहतां येत असे."

ही पद्धति प्रथमतः मद्रासचे रेव्हरंड अँड्रयु बेल ह्यांच्या लक्षांत आली. ह्या पद्धतीची परिणामकता व त्यामुळें होणारी खर्चाची बचत पाहून त्यांचा त्या पद्धतीविषयीं इतका चांगला ग्रह झाला कीं, त्यांनीं ती पद्धति इंग्लंडांत सुरू केली. त्या ठिकाणीं ह्या पद्धतीला मद्रासपद्धति अथवा वर्गनायक शिक्षणपद्धति म्हणून संबोधण्यांत येत होतें. तत्कालीन कागदपत्रांवरून ह्या हिंदी शिक्षणपद्धतीमुळें इंग्लंडांत सार्वत्रिक शिक्षणाचा प्रसार करण्याच्या कामीं कशी मोलाची मदत झाली, हें आपणांस दिसून येईल. १८१४ सालीं ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरे-

क्टरांनीं बंगालच्या गव्हर्नर-इन-कौन्सिलना पत्र लिहून ही पद्धति अमलांत आणण्याची शिफारस केली.

ह्या पद्धतीमुळें एका शिक्षकाला बरेचसे विद्यार्थी सांभाळतां येतात व त्यामुळें आर्थिक बचत होण्यास ही योजना उपयोगी पडतेच; पण केवळ शैक्षणिक दृष्टिकोनांतून जरी पाहिलें तरी आपणांस असें दिसून येईल कीं, वर्गांतील मुलांचें साहाय्य घेऊन काम करण्याच्या ह्या पद्धतीमध्यें खूप फायदे आहेत व म्हणूनच ह्या योजनेचा खूप मोठ्या प्रमाणांत वापर होणें जरूर आहे. ह्या योजनेचे कट्टर विरोधी पण ही गोष्ट कबूल करतील कीं; ह्या योजनेमुळें शिक्षकांचें काम बरेंच हलकें होतें. आजच्या आपल्या बिकट आर्थिक परिस्थितीमुळें एका शिक्षकाला जास्त मुलें सांभाळावीं लागणार; शिवाय आपल्या एथें लहान लहान खेडीं असल्यामुळें एका शिक्षकाला एकावेळीं पुष्कळ वर्ग पण घ्यावे लागणार. ह्या पद्धतीपासून विद्यार्थ्यांचासुद्धां बराच फायदा होतो. जो विद्यार्थी शिकवितो त्याचाहि फायदा होतो आणि शिकणाराचा तर होतोच होतो; आणि एकदां ह्या दोघां विद्यार्थ्यांची दिलजमाई झाली कीं, आपल्या जोडीदाराबरोबर बसून शिकणें केवळ एक खेळ ठरतो. हे दोघे गुरुशिष्य परस्परांशीं इतके जवळ आल्यामुळें, शिकविणाऱ्या विद्यार्थ्याला, जरी तंत्राची व पद्धतीची माहिती नसली तरी त्यामुळें त्याचें फारसें अडत नाहीं. ह्या पद्धतीला 'शिकतां शिकतां शिकविण्याची पद्धति' म्हणतां येईल. डॉ. फ्रँक लॉबॉक ह्या नांवाच्या एका मिशनरी शिक्षणतज्ज्ञानें प्रौढ शिक्षणाच्या प्रसारासाठीं ह्या पद्धतीचा स्वीकार करण्यास सांगितलें आहे. तो म्हणतो, 'प्रत्येक शिकलेल्या माणसानें दुसऱ्या एकातरी माणसाला शिकवावें'.



हें सर्व आख्यान सांगण्याचें मुख्य कारण म्हणजे 'एकशिक्षकी' शाळा भारतीय शिक्षण-क्षेत्रांतील एक जुनी परंपरा आहे. कांहीं पाश्चात्य लोकांनीं असा ओरडा चालविला आहे कीं, १९२१ सालीं भारतवासी लोकांकडे शिक्षणाचा ताबा सोंपविला त्यामुळें हें पाप उद्‌भवलें. त्यांचा हा दावा खोटा असल्याचें सिद्ध करण्यासाठीं एवढी लांबण लावावी लागली. आम्हांला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, शिक्षण-क्षेत्रांत आमची ही जुनी परंपरा आहे.या परंपरेमुळें आम्हांला कांहीं पद्धति निर्माण करतां आल्या; कांहीं तंत्रें शोधून काढतां आलीं. आजच्या परिस्थितींत त्यामध्यें थोडासा फेरबदल केला तर आजचे शिक्षणविषयक प्रश्न सोडविण्यासाठीं सुद्धां ह्या सामुग्रीचा आम्हांला उपयोग करून घेतां येईल. ह्या जुन्या परंपरेचा नीट उपयोग केला तर 'एक शिक्षकी' शाळेचें 'पिशाच्च' आपल्या मानगुटीला बसलें आहे असें जें आपणांस वाटतें तसें वाटणार नाहीं; उलटपक्षीं अशा शाळांची अवस्था व दर्जा सुधारण्यास ह्या जुन्या गोष्टीची मदतच होईल.

## इ. स. १८१३–१९२१

ईस्ट इंडिया कंपनीनें १८१३ सालीं ज्यावेळीं भारत एथील शिक्षणपद्धति सुधारण्याचा प्रयत्न केला, त्यावेळीं सुद्धां ही जुनी 'एक-शिक्षकी' शाळापद्धति नव्या पद्धतीचा एक भाग म्हणून स्वीकारण्यांत आली होती. मुंबई प्रांतांत १८२३ ते १८४० ह्या वर्षांत बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी ह्या संस्थेमार्फत ज्या प्राथमिक शाळा काढण्यांत आल्या. त्यांपैकीं बहुतेक सर्व शाळा ह्या 'एक-शिक्षकी' प्रकारच होत्या. त्याचप्रमाणें १८४० पासून १८५४ पर्यंत ह्या प्रांतांत बोर्ड ऑफ एज्युकेशनमार्फत ज्या प्राथमिक शाळा निघाल्या, त्यांपैकीं बहुसंख्य शाळा ह्या 'एक-शिक्षकी' शाळाच होत्या. त्यावेळीं शिक्षकांचा पगार हा मुलांच्या संख्येवर ठरविला जात होता. ५० किंवा त्यांहून कमी मुलें असणाऱ्या शाळे-साठीं १० रुपये पगार, ५० ते ७० मुलें असणाऱ्या शाळेला १२ रुपये पगार; ७० ते ९० मुलें असणाऱ्या शाळेला १५ रुपये पगार व ९० पेक्षां जास्त मुलें असणाऱ्या शाळेला २० रुपये पगार देतां येत होता. ह्याचा अर्थ असा होतो कीं, प्राथमिक शाळेंत एकाच शिक्षकाची नेमणूक करण्यांत येत होती. शाळेंत मुलांची संख्या जर जास्त असेल तर वर्ग-नायकामार्फत शिकविण्याचें काम केलें जाई. एका शाळेसाठीं एकापेक्षां अधिक शिक्षक नेमल्याचीं उदाहरणें इतकीं कमी होतीं कीं, त्यामुळें, '१८५५ सालीं मुंबई प्रांतांतील बहुतेक सर्व सरकारी शाळा ह्या 'एक-शिक्षकी' शाळा होत्या,' असें जर विधान केलें तर त्याला बाध येण्याचा संभव नव्हता.



ह्या 'एक-शिक्षकी' शाळा एक अपरिहार्य गोष्ट म्हणून खेड्यांतूनच चालविल्या जात नव्हत्या; तर ज्यांना आपण शहरें अथवा उपनगरें म्हणतों, त्याठिकाणीं सुद्धां ह्या शाळा चालविल्या जात होत्या. ही गोष्ट त्या शाळांच्या उपयुक्ततेची ग्वाही देण्यास पुरेशी आहे. त्यावेळीं शाळेंत येणाऱ्या मुलांची संख्या बरीच चांगली असे. १८५५ सालीं सरासरी एका शाळेंत ५८ मुलें शिक्षण घेत होतीं. एका वर्गांत ५ ते १० मुलें असत. शाळेंतील सर्व वर्ग एकच शिक्षक सांभाळीत असे; परंतु ह्या सर्व शाळांचें काम मात्र समाधानकारकपणें चालत असे. त्याचप्रमाणें मद्रासमध्यें जिल्ह्याच्या व तालु-क्याच्या ठिकाणीं चालणाऱ्या शाळासुद्धां 'एक-शिक्षकी' शाळाच होत्या. ह्यावरून असें दिसून येईल कीं, १८५५ सालापर्यंत जी नवी शिक्षणपद्धति अमलांत आली होती त्या पद्धतीमध्यें सुद्धां, 'एक-शिक्षकी' प्राथमिक शाळा एक नित्याची बाब म्हणून स्वीकारल्या गेल्या होत्या, असें सिद्ध करण्यास भरपूर पुरावा उपलब्ध आहे.

१८५५ सालीं, वुडसाहेबांच्या शिक्षणविषयक शिफारशी-प्रमाणें, सरकारी शिक्षणखातें जन्माला आलें व १९२१ पर्यंत शिक्षणक्षेत्रावरील संपूर्ण ताबा, त्या खात्याकडे राहिला. ह्या ६५ वर्षांच्या काळांत मात्र 'एक-शिक्षकी' शाळांची हळू

हळू पीछेहाट झाली. ह्या गोष्टीला तीन कारणें जबाबदार आहेत. ( १ ) शिक्षणाचा फैलाव झाला, त्यामुळें खूप मुलें शाळेंत येऊं लागलीं. शाळेंत मुलें वाढल्यामुळेंच जादा शिक्षक नेमावे लागले व 'एक-शिक्षकी' शाळांचें बहुशिक्षकी शाळां-मध्यें रूपांतर करावें लागलें. ( २ ) ह्या काळांत शिक्षणाचा प्रसार मोठ्या शहरांपुरता व जास्त वस्तीच्या खेडयां-पुरताच मर्यादित होता. ह्या ठिकाणीं 'एक-शिक्षकी' शाळा काढण्याची गरज फारच कमी होती. ( ३ ) 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या पुढील कारणांमुळें विशेष घटली. त्या दृष्टीनें हें कारण विशेष महत्त्वाचें मानलें जातें. इंग्लंडमध्यें वर्गनाय-काच्या मदतीनें शिक्षण देण्याची पद्धति बंद करण्यांत आली व वर्गातील मुलांची संख्या घटविण्यांत आली. इंग्रजी शिक्षण-पद्धतीचें अनुकरण करण्याच्या इच्छेनुसार ह्या दोन गोष्टी करण्यांत आल्या. इंग्लंडनें वर्गनायकामार्फत शिक्षण देण्याची प्रथा बंद केली व वर्गातील मुलांची संख्या कमी केली. हिंदी शिक्षण-तज्ज्ञांनीं इंग्लंडचें अनुकरण केलें. आमचे लोक हें विसरले कीं, ज्यावेळीं इंग्लंडमध्यें शिक्षणाचा खूप प्रसार झाला व ज्यावेळीं इंग्लंडमधील आर्थिक परिस्थिति इतकी सुधारली कीं, सार्वत्रिक शिक्षणाच्या कार्यक्रमाला बाध न आणतां शिक्षणक्षेत्रांत नव्या नव्या सुधारणा घडवून आणण्याचें सामर्थ्य त्या देशांत आलें, त्यावेळीं, त्या देशानें वर्गनायका-मार्फत शिक्षण देण्याच्या अथवा एका वर्गांत जास्त विद्यार्थी



ठेवण्याच्या अशा काटकसरीच्या योजना बंद केल्या. शिक्षणाचा प्रसार करण्याच्या कामीं भारताला फार मोठा पल्ला अजून गांठावयाचा होता. देशाचें दारिद्र्य तर वाढीला लागलें होतेंच ; पण त्याबरोबर देशाची लोकसख्या पण सारखी वाढत चालली होती. ह्या दोन गोष्टींमुळें सार्वत्रिक शिक्षणाची जबाबदारी घेण्याची ह्या देशाची ताकद वाढण्या-ऐवजीं ती सारखी घटत चालली होती; सबब शैक्षणिक कार्य-क्रम आंखतांना ज्यायोगें आर्थिक काटकसर साधतां येईल अशा सर्व पद्धतींचा स्वीकार करणें जरुरीचें होऊन बसलें. इंग्लंड व हिंदुस्थन या दोन देशांतील सामाजिक व आर्थिक क्षेत्रांतील ही विषमता लक्षांत घेतली नाहीं व इंग्लंडप्रमाणेंच या देशांतसुद्धां एका वर्गांत थोडीं मुलें घेणें व विद्यार्थ्यांना शिक्षकाकरवींच सर्व वेळ शिक्षण देण्याची सर्व व्यवस्था करणें या गोष्टींचें अगदीं आंधळेपणानें अनुकरण करण्यांत आलें. याचा परिणाम असा झाला कीं, पूर्वीं ज्या कित्येक शाळा, ' एक-शिक्षकी ' शाळा म्हणून चालविल्या गेल्या असल्या, त्या ठिकाणीं आतां दोन किंवा अधिक शिक्षक नेमण्यांत येऊं लागले. ह्या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला कीं १८५५ ते १९२१ ह्या कालखंडांत ' एक-शिक्षकी ' शाळांचें प्रमाण खूपच घटलें. ह्या काळांत शिक्षणाचीं सर्व सूत्रें शिक्षणखात्या-कडे होतीं.

ह्या एक-शिक्षकी शाळांच्या संख्येंत जी घट झाली त्या

बद्दल खेद करण्याचें कारण नाहीं. ही एक अटळ अशी घटना होती. ह्या योजनेमुळें शाळांचा मगदूर थोड्याबहुत प्रमाणांत सुधारला हें पण नाकारतां येणार नाहीं. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट ही कीं, जरी ह्या काळांत 'एक-शिक्षकी' शाळा कमी झाल्या तरी शाळांबाबत विरोधाचें वातावरण मात्र उत्पन्न झालें नाहीं. पुढें ह्या शाळांना खात्याकडून जो विरोध करण्यांत आला तो ह्या काळांत दिसून येत नव्हता; इतकेंच नव्हे, तर 'एक-शिक्षकी' शाळा ह्या एकूण शिक्षण पद्धतीचा एक अवश्य भाग म्हणून मानला गेला होता. त्या काळच्या उपलब्ध असलेल्या कोणत्याही कागदपत्रांतून ह्या शाळा कमी कार्यक्षम आहेत व त्यामुळें पैशाची उधळपट्टी होते, असा आक्षेप ह्या शाळांविषयीं घेण्यांत आलेला नाहीं.

१८५५ पासून १९२१ पर्यंत शिक्षणखात्यामार्फत जे जे कागदपत्र प्रसिद्ध झाले, त्यांपैकीं एका पत्रांतून सुद्धां 'एक-शिक्षकी' शाळांचें अस्तित्व शिक्षकाच्या कार्यक्रमाला हानि पोहोंचविणारें आहे, सबब त्या शाळा बंद केल्या पाहिजेत, असा कोठेंही उल्लेख करण्यांत आलेला नाहीं.

ह्या काळांत घडलेल्या दोन घटना मात्र 'एक-शिक्षकी' शाळांना बाधक ठरल्या. शाळांमध्यें वर्गपद्धति आली. प्रत्येक वर्गाकरितां अभ्यासक्रम आंखण्यांत आला व प्रत्येक वर्षाच्या शेवटीं मुलांना वरच्या वर्गांत चढविण्याची प्रथा सुरू झाली. इंग्लंडमध्यें त्या काळीं जें चालू होतें, त्याचीच ही नक्कल



होती. भारतामध्यें त्यावेळीं संबंध शाळा म्हणजे एक वर्ग मानला जात होता व प्रत्येक विद्यार्थ्याला स्वतंत्रपणें शिकविण्याचा रिवाज होता. त्यामुळें वर सांगितलेला बदल भारतीयांना आवडला नाहीं. त्यांच्या विरोधाचा आवाज वरपर्यंत ऐकूं गेला नाहीं व थोड्याच काळांत ही वर्गपद्धति भारतांत कायमचें ठाण मांडून बसली.

शहरी विभागांत मोठमोठ्या शाळा काढणें सोयीचें होतें. त्या ठिकाणीं एका शिक्षकाच्या ताब्यांत एक वर्ग देणें पण शक्य होतें. त्यामुळें त्या ठिकाणीं ही वर्गपद्धति फार चांगल्या रीतीनें चालत असल्याचें दिसून आलें. एथें एका शिक्षकाकडे एक वर्ग व अगदीं जरूर पडल्यास दोन वर्ग देण्यांत येत असत. परंतु ज्यावेळीं खेड्यांना ही योजना लागू करण्यांत आली; त्यावेळीं अनेक अडचणी त्या शिक्षकापुढें दत्त म्हणून उभ्या राहिल्या. त्या शिक्षकाला एकाच वेळीं ४-५ वर्ग सांभाळावे लागत. प्रत्येक वर्गासाठीं विषयवार स्वतंत्र वेळापत्रक तयार करावें लागे. शाळेचें काम सुरू झाल्यापासून संपेपर्यंत दर तासाला, प्रत्येक मुलाला कामांत गुंतविण्याची तरतूद करावी लागे. पूर्वींची वर्गनायकाच्या मदतीनें शिकविण्याची पद्धति रद्द झाली होती. त्यामुळें शिक्षकाच्या अडचणी वाढल्या होत्या. सर्वसाधारण खेड्यांतील शिक्षण बेताचेंच असे; त्याला शिकविण्याचें तंत्र माहीत नसे;

कोणत्याहि अधिकाऱ्याकडून त्याला मार्गदर्शन मिळत नसे; त्यामुळें या शिक्षकाला आपलें काम नीटपणें करतां येणें शक्य होत नसे.

---

# : २ :

१८५५ ते १९२१ ह्या काळांत, प्राथमिक शिक्षणाचा अभ्यासक्रम वरचेवर बदलला जात होता. जुना अभ्यासक्रम सोपा होता. त्यांत लिहिणें, वाचणें व गणित हे विषय शिकविण्यावर भर होता. ज्यावेळीं अभ्यासक्रमांत बदल होई, त्या त्या वेळीं अधिक विषय अभ्यासक्रमांत घुसडण्यांत येत. ह्यावेळीं इंग्लंडमध्यें वरचेवर अभ्यासक्रमांत बदल होत होता. अधिक विषय अभ्यासक्रमांत घातले जात होते. त्याची नकल एथें केली जात होती. नव्या विषयांची गर्दी वाढत होती. विद्यार्थ्यांबाबतच्या अपेक्षा पण वाढत होत्या. तात्पर्य काय कीं, प्राथमिक शाळांतील अभ्यासक्रम भरगच्च होत होता.

ही विचारप्रवृत्ति चुकीची होती, असें सांगण्याचा आशय नाहीं. परंतु ह्या सुधारणेमुळें 'एक-शिक्षकी' शाळांच्या अडचणी वाढत होत्या व त्या अडचणींकडे दुर्लक्ष पण होत होतें. जो अभ्यासक्रम आंखला जात होता, तो शहरी शाळांकरितां होता. शहरांतील शाळांमधून काम करणारे शिक्षक अधिक कार्यक्षम असत. त्या शाळांमध्यें येणारीं मुलें, चांगल्या वातावरणांतून येत असत. ह्या ठिकाणीं एका शिक्षकाकडे एक किंवा दोन वर्ग देणें सोयीचें होतें. ह्या शाळांतून हजेरीचें प्रमाण, खेड्यांतील शाळांच्या मानानें, फार चांगलें असे.

खेडेगांवांतील शाळांत सर्वच अडचणी. अभ्यासक्रम तर खूप मोठा. शाळेंतील वातावरण गैरसोयीचें. अशा परिस्थितींत त्या बिचाऱ्या एकाकी शिक्षकाला, हें सारें शिकविणें जमणार कसें ? पण ही गोष्ट कोणाच्या लक्षांतच आली नाहीं. खेड्यांतील 'एक-शिक्षकी' शाळेंत शिकविणाऱ्या शिक्षकांसाठीं निराळा अभ्यासक्रम आंखण्याची कोणाला गरजच वाटली नाहीं. ह्या बिचाऱ्या खेड्यांतील शिक्षकांच्या माथीं तोच शहरी शाळांचा अभ्यासक्रम मारण्यांत आला; इतकेंच नव्हे तर शहरांत ज्या पद्धतीनें तो शिकविला जात असे तीच पद्धति, खेड्यांत पण स्वीकारली जावी व शहरांतील शिक्षकाला जेवढें यश शिकविण्यांत मिळे तेवढेंच यश ह्या खेड्यांतील शिक्षकाला पण मिळालें पाहिजे अशीही अपेक्षा केली जात असे. ह्या कामीं शिक्षकाला जर अपयश आलें तर त्याचें खापर 'एक-शिक्षकी' शाळांच्या माथीं फोडलें जाई. अभ्यासक्रमांत नमूद केलेल्या आपल्या अपेक्षा अवास्तव आहेत, म्हणून आपल्या पदरीं अपयश आलें, ही गोष्ट कोणालाही समजून आली नाहीं. वरील परिस्थिति १९०२ सालानंतर विशेष प्रामुख्यानें दृष्टोत्पत्तीस येऊं लागली. कारण ह्या काळांत शिक्षणाचा मगदूर सुधारण्याबाबत शिक्षणखात्याची सारखी हाकाटी होती.

ह्या सर्व गोष्टींचा परिणाम 'एक-शिक्षकी' शाळांवर फारच विपरीत झाला. शहरांतील शाळांना सर्व गोष्टी अनुकूल असल्यामुळें त्यांचें काम विशेष उठून दिसूं लागलें. त्या



शाळांशीं तुलना करतांना 'एक-शिक्षकी' शाळा कमी प्रतीच्या वाटूं लागल्या. इतकेंच नव्हे तर ह्या शाळांचें काम अगदीं असमाधानकारक असतें व तें सुधारण्याकरितां कांहींतरी केलें पाहिजे असासुद्धां सूर निघूं लागला. जोंपर्यंत शिक्षणाचीं सूत्रें हीं सरकारी खात्याच्या हातीं होतीं तोंपर्यंत हा सूर दबला गेला होता; परंतु १९२१ सालीं जेव्हां शिक्षणाचीं सूत्रें हिंदी मंत्र्यांच्या हातीं गेलीं त्यावेळीं लोकांच्या ह्या असमाधानाला एकदम वाचा फुटली. 'एक-शिक्षकी' शाळा ह्या अगदीं कुचकामी आहेत व त्या ताबडतोब बंद केल्या जाव्यात अशीही मागणी होऊं लागली. ह्या विषयावर खडाजंगीची चर्चा सुरू झाली व ही चर्चा जवळजवळ वीस वर्षें रेंगाळली. ह्या सर्वांचा परिणाम असा झाला कीं, खेड्यांतील छोट्या शाळांची शैक्षणिक दृष्ट्या जी प्रगति व्हायला पाहिजे होती तिला पायबंद बसला.

## इ. स.१९२२ ते १९४७

ह्या काळांत 'एक-शिक्षकी' शाळांबाबत खूपच आक्षेप घेण्यांत आले. त्यांपैकीं कांहीं आक्षेप पुढें दिले आहेत. "खेड्यांतील शिक्षक शरिरानें दुबळा असतो. त्याचें शिक्षण तुटपुंजें असतें. दारिद्र्यामुळें तो निराश बनलेला असतो. ह्या शिक्षकाला चारपांच इयत्ता शिकवाव्या लागतात; त्याला त्या सर्व वर्गांवर सर्व विषय शिकवायचे असतात. मुलांना शाळेंत दाखल करण्याची तारीख ठरलेली नसते. मुलें वाटेल तेव्हां

शाळेंत दाखल होतात. शाळेंतील खालच्या वर्गांतून मुलांची नुसती गर्दी असते. प्रत्येक मुलाची प्रगति भिन्न भिन्न असते. ह्या वर्गांखेरीज आणखी चार वर्ग त्या बिचाऱ्या शिक्षकाला सांभाळावे लागतात. अशी ह्या ' एक-शिक्षकी ' शाळांतील परिस्थिति असते. खेड्यांतील शाळेवर कितीही निष्णात शिक्षक नेमला-मग तो पुरुष असो वा स्त्री असो—त्याच्या सर्व उत्साहावर एथें विरजण पडल्यावांचून राहात नाहीं."

" ज्या प्राथमिक शाळेंत दोहोंपेक्षां कमी शिक्षक आहेत, ती शाळा कधीं कार्यक्षम होऊं शकणार नाहीं. ज्या शाळा आज 'एक-शिक्षकी' आहेत, त्या शाळांना दुसरा शिक्षक दिला नाहीं अथवा त्या शाळांतील वर्गांची संख्या कमी करून ती एकदोन वर्गांवर आणली नाहीं, तर तेथील काम चांगलें चालणार नाहीं;अशा शाळांना एकाद्या मोठ्या शाळेच्या'भाग-शाळा ' म्हणून चालवाव्या लागतील. जीं मुलें लहान आहेत त्यांना दूरच्या मध्यवर्ति शाळेंत जातां येणार नाहीं. त्यांच्या-करितां अशी ' एक-शिक्षकी ' भाग-शाळा चालवावी; पण त्यांतील वर्गांची संख्या एक किंवा दोन वर्गांपेक्षां जास्त असूं नये. तशी जर व्यवस्था होत नसेल तर ह्या 'एक-शिक्षकी' शाळा बंद करून टाकाव्यात; कारण त्या कार्यक्षम नसतात व जास्त खर्चाच्या पण असतात. ही गोष्ट सत्य आहे कीं, लहानसान प्राथमिक शाळांना दुसरा शिक्षक देणें, पैशाच्या दृष्टीनें परवडणार नाहीं. शाळाखात्याची व्यवस्था जर काट-



कसरीनें करायची असेल तर एका प्राथमिक शाळेंत किमान १०० विद्यार्थी तरी असलेच पाहिजेत. १९२५-२६ सालीं प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांची सरासरी संख्या ४३ होती. ही जरी परिस्थिति असली तरी शाळेमध्यें केवळ एकच शिक्षक ठेवणें ( म्हणजे 'एक-शिक्षकी' शाळा चालविणें ) हें शाळेला शिक्षकांवाचून ठेवण्यासारखेंच आहे. ' एक शिक्षकी ' शाळा ही बिनशिक्षकी शाळेसारखीच असते. सबब ज्या ठिकाणीं शक्य असेल त्या ठिकाणीं मध्यवर्ति शाळा काढाव्यात व 'एक-शिक्षकी' शाळांचा वापर भाग-शाळा म्हणूनच केला जावा."

अशा प्रकारें ज्या 'एक-शिक्षकी' शाळा ह्या देशांत कित्येक वर्षें मूळ धरून बसल्या होत्या, त्यांच्याविरुद्ध ठिकठिकाणीं गिल्ला करण्यांत आला. हा सर्व विरोध करतांना ह्या शाळां-बाबत कोणतीही शास्त्रीय कसोटी लावली गेली नाहीं. बहु-शिक्षकी शाळा व 'एक-शिक्षकी' शाळा ह्यांची कोणी तौलनिक पाहणी केली नाहीं, तशा प्रकारची पाहणी करण्याचें सुचविलें नाहीं किंवा तशी कुठें चर्चासुद्धां झाल्याचें नमूद नाहीं. अशा प्रकारच्या 'एक-शिक्षकी' शाळा अमेरिका, कॅनडा, ऑस्ट्रेलिया इत्यादि देशांत त्या काळीं चालू होत्या; इतकेंच नव्हे तर त्यांचें काम पण चांगल्या प्रकारें चालू होतें, ह्याची कोणीं दखलसुद्धां घेतली नाहीं.

ह्यानंतर ह्या 'एक-शिक्षकी' शाळांवर हल्ला चढविण्याचें

काम हॉर्टोग कमिटीनें केलें. ह्या कमिटीनें ही गोष्ट मान्य केली कीं, जर परिस्थिति अनुकूल असेल व जर जादा वर्ग घेण्याचें शिक्षण घेतलेला कर्तबगार शिक्षक एकाद्या ठिकाणीं मिळण्याचा संभव असेल, तर अशा प्रकारची 'एक-शिक्षकी' शाळा चालवायला हरकत नाहीं. त्यांनीं हें सुद्धां मान्य केलें कीं, आज देशामध्यें 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या एवढी मोठी आहे कीं, त्यांच्याऐवजीं 'बहु-शिक्षकी' शाळा स्थापन करावयाचें म्हटलें तरी तें शक्य होणार नाहीं, इतकें असूनसुद्धां त्यांनीं जाहीर केलें कीं, ज्या शिक्षण-पद्धतीमध्यें अशा प्रकारच्या 'एक-शिक्षकी' शाळांवर मोठ्या प्रमाणांत अवलंबून राहणें भाग पडतें, त्या शिक्षणपद्धतीपासून विशेष कोणतीही अपेक्षा करण्यांत अर्थ नाहीं. मद्रास, बिहार व बंगाल प्रांतांत, प्राथमिक शिक्षण सहज सर्वांना उपलब्ध करून देण्यासाठीं वाढत्या प्रमाणांत 'एक-शिक्षकी' शाळा काढण्याचा जो उपक्रम चालू होता, त्याबद्दल ह्या कमिटीनें आपली नापसंती व्यक्त केली.

ह्या कमिटीनें एकदोन चांगल्या सूचना मात्र केल्या. त्यांपैकीं पहिली सूचना म्हणजे सर्व 'एक-शिक्षकी' शाळांचें रूपांतर 'भाग-शाळां' मध्यें करण्यांत यावें व त्यांच्याकडे फक्त दोनच वर्ग सोंपविण्यांत यावेत. ह्या योजनेप्रमाणें एका मोठ्या गांवांत एक 'मध्यवर्ति बहुशिक्षकी' शाळा चालावयाची. ह्या शाळेंतून १ ते ७ इयत्ता शिकविण्याची सोय व्हायची



व त्याच्या नजीकच्या खेड्यांत जी शाळा चालायची ती स्वतंत्र शाळा म्हणून न चालतां भाग-शाळा म्हणून चालायची व ह्या शाळेंतून फक्त दोनच वर्ग शिकविण्याची सोय व्हायची. खेड्यांतील मुलें जोंपर्यंत लहान असतील तोंपर्यंत तीं भाग-शाळेंत जातील. तीं मोठीं झालीं कीं मध्यवर्ति शाळेंत चालत जाऊन तिथें पुढील शिक्षण घेतील; अशी ही योजना होती. ह्या योजनेप्रमाणें 'एक-शिक्षकी' शाळेंतील वर्गांची संख्या घटाविण्यांत येणार होती व त्यामुळें प्राथमिक शिक्षणाच्या प्रसाराला बाध येणार नव्हता. कमिटीची दुसरी सूचना अशी होती कीं, शिक्षकांना एकापेक्षां अधिक वर्ग कसे सांभाळावेत याचें शिक्षण देण्यांत यावें. तिचें म्हणणें असें होतें कीं, 'एक शिक्षकी' शाळांची संख्या खूप मोठी आहे व ह्या सर्व शाळा नजिकच्या भविष्यकाळांत कांहीं बंद करतां येणार नाहींत, किंवा त्यांच्यामध्यें फारसा इष्ट असा फेरबदल पण करतां येणार नाहीं. करतां येण्यासारखी एकच गोष्ट म्हणजे, मुंबई किंवा आसाम एथें, ज्याप्रमाणें एका शिक्षकाला अनेक वर्ग सांभाळण्याचें तंत्र शिकविण्याची तरतूद केली आहे, तशी व्यवस्था सर्व ठिकाणीं करणें. एकापेक्षां अधिक वर्ग सांभाळण्याचें शिक्षण जर शिक्षकांना दिलें तर 'एक-शिक्षकी' शाळांचा मगदूर तर सुधारेलच; पण त्याचबरोबर भाग-शाळेंत काम करणाऱ्या शिक्षकांनाही त्यामुळें योग्य असें मार्गदर्शन मिळेल; असें भाष्य जरी केलें असलें

तरी 'एक-शिक्षकी' शाळांबाबतचा त्या कमिटीचा विरोध मात्र त्यामुळें लपून राहात नव्हता.

१८५५ ते १९२१ सालापर्यंतच्या काळांत ह्या 'एक-शिक्षकी' शाळांबाबत सरकारी शिक्षणखात्यानें तक्रारीचा एकही शब्द न काढतां त्यांचें अस्तित्व मान्य केलें होतें. परंतु त्यानंतर शिक्षणाचा ताबा हिंदी मंत्र्यांच्या हातीं आल्यापासून दहा वर्षांचा कांहीं काळ गेला असेल नसेल, तोंच शिक्षणखात्यानें ह्या शाळांविरुद्ध टीकेची झोड उठवली. हें असें कां झालें? ह्याची कारणमीमांसा केली तर असें आढळून येईल कीं, ही जी टीका झाली तिच्यामागें राजकीय हेतु होते. शिक्षणाची सुधारणा करण्याच्या पवित्र हेतूनें कांहीं ही टीका करण्यांत येत नव्हती. शिक्षणाचा ताबा हिंदी लोकांकडे गेला होता. सनदी युरोपियन नोकरांना आतां हिंदी मंत्र्यांच्या हाताखालीं काम करावें लागत होतें व त्यांना हा बदल पसंत नव्हता. त्यामुळें हिंदी लोकांच्या हातीं शिक्षणाचीं सूत्रें गेल्यापासून शिक्षणाचा दर्जा फार खालावला, असें सिद्ध करण्याची खटपट ही युरोपियन नोकरशाहींतील मंडळी सारखी करीत होती.

या कारवायांमागें ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या हस्तकांचा पण हात होता. २० ऑगस्ट १९१७ रोजीं, हिंदुस्थानला हप्त्याहप्त्यानें स्वराज्य देण्याचें जाहीर करण्यांत आलें होतें. हे हप्ते किती व कसे असावयाचे हें अनेक गोष्टींवर अवलंबून



राहणार होतें. त्यांपैकी एक बाब म्हणजे हिंदुस्थानची शैक्षणिक प्रगति. साम्राज्यशाहीच्या दोस्तांना असें सिद्ध करावयाचें होतें कीं, हिंदी मंत्र्यांच्या हातीं शिक्षणाचीं सूत्रें सोंपविल्यापासून शिक्षणाचा सारा खेळखंडोबा झाला. हॉर्टांग कमिटीनें ज्यावेळीं हिंदी मंत्र्यांचें शिक्षणप्रसाराचें धोरण हें उधळपट्टीचें व कुचकामी आहे असें म्हणून तत्कालीन शिक्षणपद्धतीवर हल्ला केला, तेव्हां त्याचेंही कारण हेंच होतें. त्यावेळीं छोट्या छोट्या खेड्यांना शाळा नव्हत्या व त्या गांवांत शिक्षणाचें लोण पोहोंचविण्याचें एकच साधन म्हणजे 'एक-शिक्षकी' शाळा स्थापन करणें. हिंदी मंत्र्यांनीं ह्या अपरिहार्य साधनाचा उपयोग करण्याचें ठरविलें. मंत्र्यांचें धोरण चुकीचें आहे हें सिद्ध करण्याचा अधिकारीवर्गानें चंग बांधला असल्यामुळें 'एक-शिक्षकी' शाळा सुरू करण्याच्या नुसत्या कल्पनेवर सुद्धां त्यांनीं जोराचा हल्ला चढवायला प्रारंभ केला. 'एक-शिक्षकी' शाळेविरुद्ध जो हल्ला चढविण्यांत आला, त्या मागची ही राजकीय पार्श्वभूमि ध्यानांत ठेवणें जरुरीचें आहे. ह्या प्रयोगाबाबत कोणत्याही प्रकारची शास्त्रीय चिकित्सा न करतां त्यावर अशी टीकेची झोड उठविण्यांत आली. त्या मागील राजकीय हेतु लक्षांत घेतले म्हणजे ह्या टीकेला किंमत किती द्यायची तें सहज समजून येईल.

शाही शेतकी कमिशन व हॉर्टांग कमिटी ह्यांनीं 'एक-शिक्षकी' शाळा बंद पाडण्याकरितां त्याविरुद्ध जणूं युद्धच

पुकारलें होतें. त्यांचा उपदेश कांहीं विभागांत शब्दशः पाळ- ण्यांत आला. ज्या प्रदेश सरकारांना ह्या शाळांबद्दल आत्मी- यता वाटत नव्हती, त्यांच्या हातांत नवीन शस्त्र मिळालें व बाकीच्यांनीं सुद्धां ही टीकेची झोड उचलून धरली. १९२३ सालीं मद्रासमध्यें एक शैक्षणिक परिषद भरली होती. त्या परिषदेनें अशी शिफारस केली कीं, प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करण्यासाठीं 'एक-शिक्षकी' शाळांची स्थापना करावी. ही परिषदेची सूचना मंत्र्यांनीं मान्य केली होती व त्याप्रमाणें १९२४ सालीं ८२५ 'एक-शिक्षकी' शाळा उघडण्यांत आल्या. १९२५ सालीं २०३८ व १९२६ सालीं १५०८ नव्या शाळा निघाल्या. ह्याप्रमाणें १९३० सालापर्यंत हें धोरण पाळलें गेलें. त्यानंतर ह्या शाळांबाबत आजूबाजूला होत अस- लेल्या टीकेचे पडसाद एथें पण ऐकूं येऊं लागले व सरकारी धोरणाची दिशा बदलली. सरकारनें शाळांचा पसारा न वाढवितां त्यांचा मगदूर सुधारण्याचें ठरविलें व 'एक-शिक्षकी' शाळा बंद करण्याचें पण ठरविलें. ह्या काळांत पुष्कळशा 'एक-शिक्षकी' शाळा बंद झाल्या. शाळांची संख्या घटली. १९२६–२७ सालीं शाळांची संख्या ४६३८९ होती; ती १९३६–३७ सालीं ४११४१ वर आली. वस्तुतः ही शिक्षणाची पिछेहाट झाली; परंतु या घटनेनें तेथील डायरे- क्टर साहेबांना मात्र आनंद झाला; कारण त्यामुळें "कुच- कामी, फार खर्चाच्या व अनावश्यक शाळा" बंद झाल्या.



ह्या त्यांच्या कामगिरीबद्दल मध्यवर्ति सरकारनें आपल्या पंचवार्षिक रिपोर्टात (१९३२ ते १९३७) त्यांची पाठ थोपटली. 'एक-शिक्षकी' शाळांना वाढती आर्थिक मदत मिळवून देण्याला पायबंद घातल्याबद्दल त्यांचें कौतुक कर- ण्यांत आलें. ह्या काळांत पंजाबनें पण 'धडाडीनें' काम केलें. १९२२ सालीं ह्या प्रांतांत २७५४ 'एक-शिक्षकी' शाळा होत्या; पण थोड्याच वर्षांत ही संख्या फक्त ५०० वर आली; परंतु हें धोरण सरकारला सांभाळतां आलें नाहीं. १९३६-१९३७ सालीं ह्या शाळांची संख्या १८०२ वर गेली. पंजाबमधील एकूण प्राथमिक शाळांपैकीं शेंकडा ३१ शाळा, ह्या 'एक-शिक्षकी' शाळा होत्या.

मद्रासच्या पावलावर उत्तर प्रदेशानें पण आपलीं पावलें टाकायला प्रारंभ केला. १९२२ ते १९३२ ह्या काळांत तेथील प्राथमिक शाळांची संख्या १६८०० वरून २१७०० वर गेली, परंतु वर सांगितल्याप्रमाणें धोरणांत बदल झाला व १९४५ सालीं ही शाळांची संख्या घटून १९२०० वर आली. १९२७ सालीं 'एक-शिक्षकी' शाळांचें प्रमाण शेंकडा ५० होतें, तें १९४५ सालीं शेंकडा २० वर आलें. ह्या सर्व धोरणाचा परिणाम देशाच्या शैक्षणिक प्रगतीवर केवढा जबर- दस्त झाला, त्याची नुसती कल्पनाच केलेली बरी. बडोदें संस्थानांत तर ह्या धोरणाची विशेष कसोशीनें अंमलबजावणी करण्यांत आली. जवळ जवळ सर्व 'एक-शिक्षकी' शाळा ह्या

काळांत नाहींशा झाल्या. एक तर त्या बंद करण्यांत आल्या किंवा त्या शाळांमध्यें दुसऱ्या शिक्षकाची नेमणूक करण्यांत आली. त्या संस्थानांत तर असा नियमच करण्यांत आला कीं ७५ मुलांची संख्या जमेपर्यंत नवी प्राथमिक शाळा उघडण्यांत येऊं नये.

ह्या नियमाचे परिणाम फार घातुक झाले. १९२६–२७ सालीं ह्या संस्थानांत शाळांची संख्या २९९६ होती; ती १९३७–३८ सालीं २५४२ वर आली. ह्या काळांत 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या घटून फक्त ३३ च 'एक-शिक्षकी' शाळा जिवंत राहिल्या. १३२५ खेड्यांना शाळा मिळूं शकल्या नाहींत; कारण त्या ठिकाणीं ७५ मुलें शाळेला मिळूं शकलीं नाहींत; म्हणजे एकूण संख्येपैकीं शेंकडा २१ लोकांना शिक्षणाचा फायदा मिळूं शकला नाहीं. ह्या १३२५ गांवांत तर शाळांची गरज विशेष होती; कारण त्या गांवांत आदिवासी ( रानी परज ) लोक राहात होते. ७५ मुलांची किमान संख्या ह्या गांवांत न जमूं शकल्यामुळे हे दीन-दुबळे शिक्षणाला पारखे झाले.

दुसऱ्या कांहीं प्रदेश सरकारांनीं पण 'एक-शिक्षकी' शाळा बंद करण्याचा प्रयत्न केला; कांहींनीं त्यांची संख्या कमी करण्याचें टरविलें. परंतु ह्या कामीं त्यांना फारसें यश आलें नाहीं. ह्या 'एक-शिक्षकी' शाळा एखाद्या चिवट म्हाताऱ्या-प्रमाणें जीव धरून बसल्या. ह्याचें मुख्य कारण एकच कीं



आम जनतेला त्यांची जरुरी वाटत होती. शिक्षणाचा प्रसार व्हावा अशी जनतेची तळमळ होती व म्हणूनच ह्या शाळा जिवंत राहिल्या; इतकेंच नव्हे तर कांहीं ठिकाणीं त्यांची संख्या वाढली सुद्धां; परंतु ह्या 'एक-शिक्षकी' शाळांविरुद्ध जी आघाडी उघडण्यांत आली तिचा परिणाम असा झाला कीं, त्यामुळें शिक्षणाच्या प्रसाराला पायबंद बसला व त्यामुळें ज्या मागासलेल्या खेड्यांना शिक्षणाची विशेष गरज होती; त्यांना शाळा मिळूं शकल्या नाहींत व तेथील मुलांच्या शिक्षणाची सोय होऊं शकली नाहीं.

'एक शिक्षकी' शाळा बंद करून शाळांचा मगदूर सुधारण्याची चळवळ जरी कांहीं लोकांनीं चालविली होती, तरी देशांतील कांहीं विचारवंत लोकांनीं ह्या चळवळीला जोरानें विरोध करण्याचें ठरविलें. ह्या कामीं पण पुढाकार जे. ए. रिशी नांवाच्या एका परदेशी माणसानें घेतला. हा गृहस्थ एक अधिकारी होता. परंतु तो कर्तबगार व दयाळू वृत्तीचा असल्यामुळें कित्येक शिक्षणविषयक प्रश्नांचा त्यानें अगदीं सखोल अभ्यास केला होता. १९२९ सालीं त्यानें एक लेख लिहून 'एक-शिक्षकी' शाळा सुधारण्याची सूचना केली होती. खेड्याच्या शाळेतील एकट्या शिक्षकाला फारच कठीण असें काम करावें लागत होतें, ही गोष्ट त्यानें मान्य केली होती. परंतु ह्या शिक्षकाचें काम जरी कठीण असलें तरी त्याला करतां येणें अशक्य नाहीं असें त्याचें मत होतें.

तो म्हणाला, "लोक म्हणतात, ह्या 'एक-शिक्षकी' शाळांमध्यें कदापि सुधारणा होणें शक्य नाहीं. त्या कायमच्या बंदच केल्या पाहिजेत. आपण जर ही टीका मान्य केली तर मग हिंदुस्थानांत शिक्षणाचा प्रसार होण्याची आशा आपण कायमची सोडून दिली पाहिजे; कारण ज्या गांवांतलि लोक-संख्या मागासलेली आहे व ज्या ठिकाणीं ती विरळ आहे, त्या ठिकाणीं शिक्षणाचें लोण पोहोंचविण्याचें एकच माध्यम आहे आणि तें म्हणजे 'एक-शिक्षकी' शाळा. खर्चाच्या दृष्टीनें दुसरी कोणत्याही पद्धतीची शाळा परवडणें शक्य नाहीं. 'एक-शिक्षकी शाळांत सुधारणा होणें शक्यच नाहीं' हें विधानच अतिशयोक्तिपूर्ण आहे. अमेरिका, कॅनडा, ऑस्ट्रे-लिया व दक्षिण आफ्रिका ह्या ठिकाणीं हजारो 'एक-शिक्षकी' शाळा चांगलें काम करीत असल्याचे दाखले दसरीं दाखल आहेत. मीं स्वतः अशा कित्येक चांगल्या 'एक-शिक्षकी' शाळा दक्षिण आफ्रिकेंत पाहिल्या आहेत; इतकेंच नव्हे तर खुद्द हिंदुस्थानांत मीं अशा चांगल्या 'एक-शिक्षकी' शाळांची तपासणी केली आहे."

म्हैसूर संस्थानचे त्या वेळचे डायरेक्टर श्री. सुब्बाराव ह्यांनीं पण 'एक-शिक्षकी' शाळांचा चांगलाच पाठपुरावा केला. त्यांचें म्हणणें असें कीं, ज्याअर्थी ह्या 'एक-शिक्षकी' शाळा अमेरिकेंत फार दिवसपर्यंत मूळ धरून बसूं शकल्या, याअर्थी त्यांच्यामध्यें कांहीं तरी विशेष असलेंच पाहिजे. ते



म्हणाले, 'अमेरिका हा सुसंपन्न देश आहे. त्या ठिकाणीं दळणवळणाचीं साधनें फारच चांगलीं आहेत. त्या ठिकाणीं 'एक-शिक्षकी' शाळा चालविण्याची गरज भासते; मग म्हैसूरमध्यें किंवा हिंदुस्थानामध्यें ज्या ठिकाणीं पुष्कळशा 'एक-शिक्षकी' शाळा आहेत तेथें शिक्षणाची पुनर्रचना करतांना ह्याच शाळांची मदत घ्यावी लागेल. कांहीं काळ-पर्यंत तरी ह्या शाळांना शिक्षणक्षेत्राचा एक अविभाज्य घटक म्हणून मानावें लागेल. त्या शाळांची जास्तीत जास्त सुधारणा करून त्यांची कार्यक्षमता वाढवावी लागेल." अशाच प्रकारचे उद्‌गार, बडोदें संस्थानांतील शिक्षणाच्या पुनर्रचनेबाबत रिपोर्ट करण्याचें काम ज्यांच्याकडे दिलें होतें, त्या 'लिटल् हेल्स्' नांवाच्या गृहस्थांनीं काढले. 'एक-शिक्षकी' शाळां-विरुद्ध चालू असलेल्या मोहिमेचा त्यांनीं कडक शब्दांत निषेध केला. तो म्हणाला, "ट्रेन्ड शिक्षकाच्या हातीं जर 'एक-शिक्षकी' शाळा सोंपविल्या तर त्यांचें काम समाधान-कारकपणेंच चालेल. त्याबाबत तक्रार करण्यासारखें कांहीं राहणार नाहीं. ह्याच्यापुढें जाऊन मी असें म्हणेन कीं, तात्पुरती योजना म्हणून अनट्रेन्ड माणसांच्या हातीं पण 'एक-शिक्षकी' शाळा द्यायला हरकत नाहीं. एकदां बंद झालेली शाळा पुन्हा चालू करणें केवढें कठीण काम आहे, ह्याचा मला जाणीव असल्यामुळें, केवळ एकाद्या 'एक-शिक्षकी'

शाळेंतील शिक्षक अन्‌ट्रेन्ड आहे एवढ्या सबबीवर ती शाळा मी बंद होऊं देणार नाहीं. खात्याचें धोरण ह्या 'एक-शिक्षकी' शाळा बंद करण्याचें आहे; अशा प्रकारच्या आतां फक्त ६० च शाळा शिल्लक राहिल्या आहेत. त्यांपैकीं १० तर जवळजवळ बंदच आहेत. पूर्वी ज्या 'एक-शिक्षकी' शाळा होत्या, त्यांपैकीं बऱ्याचशा बंद झाल्या; कांहींना एक जादा शिक्षक देण्यांत आला. हें धोरण देशाच्या हिताचें नाहीं, असें माझें मत आहे—विशेषतः देशांतील शिक्षणाची प्रगति होण्याचा जो काळ आहे, त्या काळांत तर हें धोरण जास्त चुकीचें आहे. ज्या ठिकाणीं ह्या शाळा बंद करण्यांत आल्या त्या ठिकाणीं जनतेला शिक्षण देण्याचें इतर कोणतेंही साधन उपलब्ध नसल्यामुळें मुलांना अडाणी राहण्यावांचून गत्यंतर नाहीं. ज्या ठिकाणीं दोन शिक्षक देण्यांत आले त्या शाळांतील मुलांची वैयक्तिक प्रगति जरी थोडीबहुत सुधारली असली तरी शाळेंतील मुलांची संख्या कांहीं म्हणण्यासारखी वाढली नाहीं. ही संख्या दुपटीनें तर निश्चितच वाढली नाहीं. शाळेवर होणाऱ्या खर्चाचें प्रमाण मात्र दुप्पट झालें. त्या मानानें शिक्षणांत कांहीं विशेष सुधारणा झाली नाहीं. ''

ते पुढें म्हणतात, '' ह्या संस्थानांत अशीं लहान लहान खेडीं राहणारच कीं, ज्या ठिकाणीं 'एक शिक्षकी' शाळेखेरीज दुसरी शाळा चालविणें खर्चाच्या दृष्टीनें परवडणार नाहीं. निरक्षरतेचें प्रमाण फारच मोठें असल्यामुळें शैक्षणिक



क्षेत्रांत गळती ही राहणारच; सबब जगांतील इतर खेड्यांतून ज्या प्रमाणें 'एक-शिक्षकी' शाळा मूळ धरून राहिल्या आहेत, त्याप्रमाणें त्या बडोदें संस्थानांतील कांहीं भागांतसुद्धां राहणारच. आज आवश्यक गोष्ट कोणती असेल तर ती ही कीं, 'एक-शिक्षकी' शाळेमध्यें काम करणारा जो शिक्षक आहे तो ट्रेन्ड असायला पाहिजे व त्याच्याजवळ कामाची तळमळ असायला पाहिजे. एका शिक्षकाला पुष्कळ वर्ग चालविणें अशक्य आहे, असें जगांतील ज्या ज्या देशांत 'एक-शिक्षकी' शाळा आहेत, त्या देशांना वाटलें नाहीं. बडोद्यामधील 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकांनासुद्धां अनेक वर्ग चालविणें अशक्य होणार नाहीं. ज्या ज्या ठिकाणीं 'एक-शिक्षकी' शाळा बंद झाल्या असतील, त्या त्या ठिकाणीं त्या पुन्हा चालू केल्या जाव्यात व त्या शाळांवर ट्रेन्ड शिक्षकांची नेमणूक केली जावी, अशी मी शिफारस करतों. ''

ह्या 'एक-शिक्षकी' शाळा बंद करण्याच्या धोरणाविरुद्ध जोराची हाकाटी श्री. रामभाऊ परुळेकरांनीं केली. ह्या प्रश्नाच्या सर्व महत्त्वाच्या बाबींचा त्यांनीं अगदीं सविस्तर व सांगोपांग असा अभ्यास केला व ते म्हणाले, '' जे लोक ह्या 'एक-शिक्षकी' शाळा बंद कराव्यात अथवा त्यांचें भाग-शाळेंत रूपांतर केलें जावें किंवा त्या एकाद्या मोठ्या शाळेंत समाविष्ट केल्या जाव्यात असा आग्रह धरतात, त्या लोकांना हिंदुस्थानच्या शिक्षणपद्धतींत ह्या शाळांचें स्थान किती महत्त्वाचें

आहे, ह्याची कल्पनाच आलेली नाहीं. ह्या शाळा बंद करण्याची मागणी करणें हा चुकीचा मार्ग आहे. ह्या बाबतींत योग्य धोरण त्या शाळांची सुधारणा करण्याचें असलें पाहिजे; त्या बंद करण्याचें धोरण असतां कामा नये."

ह्या शहाणपणाच्या धोरणाला दिवसेंदिवस जास्त जास्त पाठिंबा मिळूं लागला. ह्या काळांत ज्या दोन घटना घडल्या त्यामुळें ह्या 'एक-शिक्षकी' शाळांबाबतचा दृष्टिकोन बदलण्यास मदत झाली. इंडियन एज्युकेशन् सर्व्हिस ह्या नांवानें ओळखली जाणारी सनदी नोकरांची श्रेणी बंद करण्यांत आली व तपासणी खात्यांतील शेवटचा युरोपियन अधिकारी ह्या सुमारास सेवानिवृत्त झाला. त्यामुळें प्रतिगामी मनोवृत्तीच्या लोकांचा बालेकिल्लाच ढांसळला. ह्यानंतर प्रांतिक स्वायत्तता मिळाली. कॉंग्रेसच्या मंत्र्यांनीं राज्यकारभाराचीं सूत्रें हातीं घेतलीं, त्यामुळें प्राथमिक शिक्षणाचा विस्तार करण्याच्या कार्यक्रमाला जोराची गति मिळाली. ह्याचा परिणाम साहजिकच 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या वाढण्यावर झाला. शाही शेतकी कमिशननें १९२८ सालीं ह्या शाळांविरुद्ध जें काहूर उठविलें होतें त्याला १९४७ सालीं भारताला स्वातंत्र्य मिळाल्यावर कायमची मूठमाती मिळाली. आज ' एक-शिक्षकी शाळा कायमच्या बंद कराव्यात ' अशी मागणी करणारे शिक्षणतज्ज्ञ हाताच्या बोटांवर मोजण्याइतके तरी शिल्लक असतील कीं नाहीं, ह्याची शंका वाटते. त्यांचें अढळस्थान आज अग्रम



दुनियेनें मान्य केलें आहे. ह्या शाळांच्या प्रश्नाकडे जास्तीत जास्त लक्ष देण्यांत येत आहे. त्यांच्या अडचणी शास्त्रीय पद्धतीनें हाताळल्या जात आहेत. ह्या शाळांची सुधारणा करणाऱ्यांचें लक्ष त्या शाळांविषयींच्या कठीण व महत्त्वाच्या प्रश्नांवर केंद्रीभूत झालेलें आहे. आमच्या ग्रामीण शिक्षणाच्या भवितव्याचा विचार करतांना ह्या नव्या दृष्टिकोनाचें व विचारप्रवृत्तीचें खूप आनंदानें स्वागत करणें जरूर आहे.

---

# : ३ :

## परदेशांतील एक-शिक्षकी शाळा

'एक-शिक्षकी' शाळांविषयींच्या अनेक महत्त्वाच्या प्रश्नांबाबत ह्यापुढें आपणांस विचार करावयाचा आहे. ह्या शाळांतील शिक्षणाचा मगदूर कसा सुधारावा, त्यांची तपासणी व देखरेख अधिक कार्यक्षम कशी व्हावी इत्यादि अनेक तत्संबंधींच्या प्रश्नांचा विचार करण्यापूर्वी, इतर देशांत ज्या 'एक-शिक्षकी' शाळा चालू आहेत, त्यांचा सूक्ष्मपणें अभ्यास केला पाहिजे व त्यांपासून आपणांस कांहीं मार्गदर्शन मिळतें का, हेंही आपण पाहिलें पाहिजे. 'एक-शिक्षकी' शाळांचे प्रश्न हाताळण्याचें काम एकट्या भारतालाच करावें लागत आहे असें नाहीं. जगांत सर्वत्र छोट्या छोट्या वस्तीचे कांहीं कांहीं विभाग आहेतच. त्यामुळें ह्या 'एक-शिक्षकी' शाळा आज जवळ जवळ विश्वव्यापी झाल्या आहेत. कांहीं देशांमध्यें ह्या शाळांची संख्या इतकी मोठी आहे कीं, त्यांची सुधारणा करण्यासाठीं त्या देशांना खास प्रयत्न करण्याची गरज भासूं लागली आहे. त्या ठिकाणीं ह्या शाळांची कार्यक्षमता वाढविण्यासाठीं बरेंचसें संशोधन करण्यांत आलें आहे. वेगवेगळे प्रयोग पण करण्यांत आले आहेत. ह्याच्या उलट कांहीं देशांमध्यें ह्या



शाळांची संख्या फारच लहान आहे, त्यामुळें ह्या शाळांकडे विशेष लक्ष देण्याची त्यांना गरजच वाटत नाहीं. ज्या देशांत अशा 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या खूप मोठी आहे त्या देशांचे अनुभव आपल्या देशांतील 'एक-शिक्षकी' शाळांचे प्रश्न सोडवितांना आपणांस निश्चित मार्गदर्शक वाटतील, ह्यांत मुळींच शंका नाहीं. अतएव, आमच्या देशांतील शिक्षण-तज्ज्ञांनीं ह्या 'एक-शिक्षकी' शाळांबाबत जेवढें म्हणून लिखाण आजूबाजूला उपलब्ध असेल, त्याचा काळजीपूर्वक अभ्यास केला पाहिजे. परदेशांनीं 'एक-शिक्षकी' शाळांची सुधारणा करण्यासाठीं जे मंत्रतंत्र शोधून काढले असतील, त्यांचा वापर, आमच्या ग्रामीण परिस्थितींत, चांगल्या रीतीनें कसा करतां येईल तें नीट पारखून पाहिलें पाहिजे.

### अमेरिका

ह्या बाबतींत एका मोठ्या देशाचे अनुभव आम्हांला खूपच मार्गदर्शक होतील. तो देश म्हणजे अमेरिका. अमेरिका हा देश शहरांनीं व्यापलेला आहे अशी सर्वसाधारण लोकांची समजूत आहे. मात्र सत्य परिस्थिति ह्याच्या अगदीं उलट आहे. अमेरिका हा देश खेडींप्रधान आहे. ह्या देशांतील एकूण लोकसंख्येपैकीं शेंकडा ४५ लोक खेड्यांतून राहतात. अमेरिकेंतील १२ प्रदेशराज्यांतूनच शहरी प्रजेच्या संख्येचें प्रमाण अधिक आहे. २७ प्रदेशराज्यांमध्यें ग्रामीण प्रजेचेंच प्रमाण अधिक असल्याचें दिसतें. ह्या अमेरिकेच्या ग्रामीण विभागांतील

प्रातिनिधिक शाळा, ही 'एक-शिक्षकी' शाळा आहे; ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ह्या देशांतील 'एक-शिक्षकी' शाळेची परंपरा फार जुनी आहे.

अमेरिकेंत वसाहत करण्यासाठीं जे लोक नव्यानें आले होते, ते आपले छोटे छोटे कंपू करून राहत होते. ह्या लोकांनीं, आपल्या मुलांसाठीं एक छोटी ' लाल शाळा ' बांधली. आपल्या वस्तीपासून, मुलांना सहज चालत जातां येईल एवढ्या अंतरावर ही शाळा होती. ही शाळा ' एक-शिक्षकी ' शाळाच होती. थोडीं मुलें, साधी शाळा व एक शिक्षक. अशा ह्या परिस्थितींत जन्माला आलेल्या ह्या ' एक-शिक्षकी ' शाळा, गेल्या कित्येक वर्षांत, ह्या देशांत झालेल्या सर्वांगीण प्रगतीच्या जमान्यांत सुद्धां, एथें अजून मूळ धरून बसल्या आहेत. त्या नुसत्याच जगल्या आहेत असें नाहीं; तर त्या खूप मोठ्या संख्येनें, चांगल्या जिवंत राहिल्या आहेत. ह्या शाळांची संख्या पाहिली व ज्या गांवां-मध्यें त्या कार्य करीत आहेत, त्या गांवांकडे पाहिलें तर आपणांस आश्चर्यच वाटेल. एथील एकूण प्राथमिक शाळांच्या मानानें, एथें 'एक-शिक्षकी' शाळांचें प्रमाण खूपच मोठें आहे. भारतांत सुद्धां आज 'एक-शिक्षकी' शाळांचें प्राथमिक शाळांशीं, एवढें मोठें प्रमाण पडत नाहीं.

१९३७-३८ सालीं अमेरिकेंत एक शिक्षणविषयक पाहणी झाली. त्यावेळीं असें आढळून आलें कीं, अमेरिकेंतील ४८ प्रदेश-सरकारांत व कोलंबिया जिल्ह्यांत मिळून त्यावेळीं २,२९,३९४ शाळा होत्या. त्यांपैकीं ५२·८ टक्के शाळा एका खोलींत भरत होत्या. ह्या काळीं बहुतेक प्रदेश-सर-कारांच्या जवळजवळ निम्म्या शाळा एका खोलींत भरत असत. ह्या प्रदेश-सरकारांपैकीं १६ राज्यांत तर ६४·७७ टक्के शाळा ' एक-शिक्षकी ' होत्या.



ह्या परिस्थितीमुळें अमेरिकेंतील शिक्षणतज्ज्ञांनीं ग्रामीण शिक्षणाचा, विशेषतः 'एक-शिक्षकी' शाळांचा प्रश्न काळजीपूर्वक हाताळण्याचें ठरविलें. नवीन कल्पना समाजा-पुढें ठेवण्यांत आल्या. त्यांचा प्रयोग करण्यांत आला. विश्व-विद्यालयांनीं व ह्या क्षेत्रांत जिव्हाळ्यानें काम करणाऱ्या इतर संस्थांनीं प्रयोग करण्यासाठीं कांहीं योजना आंखल्या. पुष्कळसें संशोधन पण करण्यांत आलें. ग्रामीण शिक्षणाबाबत व छोट्या ग्रामीण शाळांबाबत माहिती देण्याकरितां खास अभ्यासवर्ग काढण्यांत आले. थोड्याच काळांत ह्या प्रश्नाचा सांगोपांग अभ्यास करण्यांत आला. ह्या विषयावर खूपच मोठ्या प्रमाणांत वाङ्मय निर्माण करण्यांत आलें. अमेरिकेखेरीज दुसऱ्या कोण-त्याही देशाला ह्या कामासाठीं एवढा पैसा खर्च करणें शक्य झालें नसतें. तात्पर्य काय कीं, अमेरिकेनें ह्या बाबतींत जी अनु-भवाची संपत्ति मिळविली व जें साहित्याचें भांडार उपलब्ध करून ठेविलें त्याचा फायदा भारताला जरूर करून घेतां येईल.

अमेरिकेंतील शिक्षणतज्ज्ञांनीं एका वेळीं असा निर्णय

घेतला कीं, ' एक-शिक्षकी ' शाळांविषयींच्या सर्व प्रश्नांतून सुटका करून घेण्यासाठीं केंद्र-शाळा स्थापन कराव्यात. ह्या केंद्र-शाळांमध्यें भोंवतालच्या विभागांत राहणाऱ्या मुलांना नेण्या-आणण्याची व्यवस्था करावी. अशी केंद्र-शाळा उघडल्या-वर आजूबाजूच्या ' एक-शिक्षकी ' शाळा बंद करून टाका-व्यात. ह्या चळवळीला शाळांच्या केंद्रीकरणाची चळवळ असें म्हणत असत. एकेकाळीं ह्या चळवळीला खूप वेग आला होता. आजसुद्धां थोड्या बहुत प्रमाणांत ही चळवळ चालू आहे.

ही शाळांच्या केंद्रीकरणाची चळवळ अमेरिकेंतच कांहीं नव्यानें जन्माला आली नव्हती. ज्या ज्या देशांना ' एक-शिक्षकी' शाळेचे प्रश्न हाताळावे लागले, त्या त्या देशांना ह्या चळवळीकडे लक्ष देणें क्रमप्राप्त झालें. ह्या बाबतींत श्री. एफ्. टेद् नांवाच्या तज्ज्ञाचे पुढील उद्गार आपणांस उद्बोधक वाटतील. तो म्हणतो, " एक-शिक्षकी शाळांच्या कांहीं विशिष्ट अडचणींमुळें ग्रामीण शाळांच्या केंद्रीकरण करण्याच्या प्रश्नाला जोराची चालना मिळाली. ज्या ठिकाणीं रस्ते चांगले आहेत, मुलांची ने-आण करण्याला फारसा खर्च पडत नाहीं त्या ठिकाणीं छोट्या छोट्या 'एक-शिक्षकी ' शाळा बंद करून मुलांना केंद्र-शाळेंत, रोज नेणें-आणणें फायद्याचें होईल. ह्या केंद्र-शाळांमधून मुलांना अनेक चांगल्या गोष्टी देतां येतील. शाळेसाठीं विस्तीर्ण इमारती



बांधतां येतील. साहित्य मुबलक देतां येईल. प्रत्येक वर्गासाठीं स्वतंत्र खोली मिळेल. प्रयोगशाळा बांधतां येईल. मुलांना व्यवसाय शिकविण्यासाठीं एखादी जागा राखून ठेवतां येईल. अधिक लायक व कार्यक्षम असा शिक्षकवर्ग नेमतां येईल. अभ्यासक्रमांत अधिक वैचित्र्य आणतां येईल. सामाजिक व करमणुकीचे कार्यक्रम घडवून आणण्यासाठीं भरपूर तरतूद करण्यांत येईल. अशा प्रकारें खर्च केलेल्या पैशाचा योग्य मोबदला देण्यांत येतो अशी जर सर्वसाधारण नागरिकाची खात्री पटवून देतां आली तर दूरच्या शाळेंत मुलांना पाठ-विण्याबाबत पालकांचा जो विरोध होता तो नाहींसा होईल. अमेरिका, कॅनडा व इंग्लंड ह्या देशांतील केंद्र-शाळांमुळें ग्रामीण शिक्षणाचा दर्जा खूपच सुधारला आहे.

ही केंद्र-शाळांची योजना खूप खर्चाची आहे. ह्या शाळांना 'नित्य' (Recurring) व नैमित्तिक (Non-recurring) खर्चासाठीं खूप मोठी रक्कम लागते. अमेरिका हा एक अतिशय समृद्ध असा देश आहे, म्हणूनच ह्या देशाला शाळांच्या केंद्रीकरणाकरितां पुष्कळसा पैसा खर्च करतां आला. ह्या शाळांसाठीं इमारती बांधाव्या लागल्या. मुलांना रोज बस-मधून नेण्यासाठीं तरतूद करावी लागली. परंतु अमेरिके-सारख्या वैभवसंपन्न देशांतसुद्धां, शाळांच्या केंद्रीकरणाची ही योजना मंदगतीनें चालू लागली; कारण वेळोवेळीं आर्थिक अडचणींमुळें ह्या योजनेला पायबंद लागतो. ह्यामुळें आतां

अमेरिकेंतील शिक्षण-तज्ज्ञांनीं असा निर्णय घेतला आहे कीं, जेव्हां व जेथें शक्य होईल तेव्हां व तेथेंच केंद्र-शाळा स्थापन कराव्यात. त्यांना ही जाणीव होती कीं, अशा हजारो शाळा आहेत कीं, ज्यांचें केंद्रीकरण करणें कालत्रयीं शक्य होणार नाहीं व त्यामुळें अशा ह्या 'एक-शिक्षकी' शाळांचा मगदूर सुधारण्याच्या प्रश्नाकडे त्यांना विशेष लक्ष देणें भाग पडलें आहे.

'एक-शिक्षकी' शाळेची मुख्य अडचण म्हणजे त्या शाळेंतील एकाकी शिक्षकाला, एकाच वेळीं ८ इयत्ता सांभाळाव्या लागतात. ह्यामुळें एथील शिक्षणतज्ज्ञांनीं खूप प्रयत्न करूनही वर्गांची संख्या ८ ऐवजीं ५ किंवा ६ कशी आणतां येईल ह्याचा प्रामुख्यानें विचार केला.

ह्या बाबतींत एक मार्ग असा होता कीं, लहान शाळेंतून ४ किंवा ५ वर्गांच्या पेक्षां जास्त वर्ग शिकविण्यास कायद्यानें बंदी करणें. ह्या बाबतींत दोन प्रदेशसरकारांनीं पुढाकार घेतला. ही योजना म्हणजे हॉर्टांग कमिटीनें सुचविलेल्या भाग-शाळेच्या योजनेचीच एक आवृत्ति होती. ही योजना फारशी कांहीं यशस्वी होऊं शकली नाहीं. कारण ही योजना व शाळांच्या केंद्रीकरणाची योजना, ह्या दोघी जोडीनें चालावयास पाहिजे होत्या. कारण वरचे वर्ग शिकविण्यासाठीं केंद्र-शाळांची स्थापना होणें अगत्याचें होतें. केंद्र-शाळांची स्थापना व मुलांच्या वाहतुकीची व्यवस्था केल्यावांचून 'एक-शिक्षकी' शाळेंत वरचे वर्ग शिकविण्याची बंदी करणें शक्य नव्हते.



ह्या केंद्र-शाळा उघडण्यास व वाहतुकीची व्यवस्था करण्यास पैसा लागणार होता व त्यामुळें हा प्रयोग ज्या ठिकाणीं परिस्थिति अनुकूल असेल अशा विशिष्ट ठिकाणापुरताच मर्यादित करण्यांत आला होता.

ह्या बाबतींत आणखी एक प्रयोग करण्यांत आला. शाळांतील इयत्तांची संख्या कमी करण्यासाठीं दोन वर्गांचा एक वर्ग करण्याचें ठरलें. अशा रीतीनें ८ ऐवजीं ४ च इयत्ता शाळेंत राहणार होत्या. या प्रकारें तयार झालेल्या ह्या जोडवर्गांकरितां वेगळा अभ्यासक्रम आंखण्यांत आला. ह्या योजनेला 'इयत्तांचें एकीकरण अथवा बदल' असें नांव देण्यांत आलें. ह्या योजनेप्रमाणें, स्थानिक परिस्थितीनुसार वर्गांचें एकीकरण करण्यांत येत असे. सर्वसाधारणपणें ३ री, ४ थी, ५ वी, ६ वी, ७ वी, ८ वी ह्या इयत्तांचें एकीकरण होत असे. दक्षिणेकडील विभागांत शाळांची वाढ विशेष झाली नव्हती. त्या ठिकाणीं २ री, ३ री, ४ थी, ५ वी, ६ वी, ७ वी ह्या इयत्तांचें एकीकरण करण्यांत आलें. १ ली व दुसरी या इयत्तांचे वर्ग एक करण्याची सूचना मात्र बऱ्याचशा प्रदेश-सरकारांना मान्य झाली नाहीं. १ ली व २ री इयत्ता सुद्धां जर एक केली असती, तर ८ इयत्तांची शाळा ४ इयत्तांवर आली असती. अशा रीतीनें एका शिक्षकाला जे ८ वर्ग सांभाळावे लागत होते, त्यांची संख्या ४ वर आणण्यांत येते.

याप्रमाणें इयत्तांचें एकत्रीकरण झाल्यावर, बदलत्या परिस्थितीला अनुरूप असा अभ्यासक्रम तयार करण्याची जबाबदारी आली. त्याप्रमाणें व्यवस्थासुद्धां करण्यांत आली. अशा रीतीनें निरनिराळे प्रयोग करण्यांत आले. ह्या प्रयोगांमागें एक अशी विचारसरणी होती कीं, शाळांतील इयत्तांची संख्या कमी करतां येणें शक्य आहे. शाळेंतील सर्व मुलांना ३, ४ किंवा ५ वर्गांत विभागून त्यांना योग्य असा अभ्यासक्रम देतां येणें शक्य आहे.'एक-शिक्षकी' शाळांच्या आज तीन मुख्य अडचणी आहेत-( १ ) एका शिक्षकाला पुष्कळ इयत्ता शिकवाव्या लागतात, ( २ ) प्रत्येक वर्गांत मुलांची संख्या फार कमी असते व ( ३ ) शाळेंत येणाऱ्या मुलांमध्यें त्यांचीं वयें, त्यांचे अनुभव व त्यांच्या आवडी ह्या बाबतींत खूपच मोठें अंतर असतें. वर सांगितल्याप्रमाणें मुलांची विभागणी केली तर एक-शिक्षकी शाळेंतील ठळक दोष नाहींसे करण्यास त्यांची मदत होईल असें त्यांना आढळलें.

एकाकी 'एक शिक्षकी' शाळेच्या मार्गांतील आणखी एक अडचण म्हणजे, त्या शाळांतून शिकवाव्या लागणाऱ्या विषयांची संख्या. ज्याप्रमाणें वर्गांचें एकीकरण करण्यांत आलें, त्याप्रमाणें विषयांचें एकीकरण करण्याचा प्रयत्न झाला. पूर्वी एका विषयाचे दुसऱ्या विषयाशीं सोयरसुतक नसे. ही जुनी कल्पना नव्या शिक्षणपद्धतींत मागें पडूं लागली होती. ज्या ठिकाणीं एका शिक्षकाकडे एक इयत्ता होती त्या ठिकाणीं



तर दोन विषयांची सांगड घालण्याचा प्रयत्न करण्यांत येत होता. नवीन शिक्षणपद्धतींत वेगवेगळ्या विषयांचा समवाय साधावयाचा असतो. विद्यार्थ्यांना ज्या गोष्टींमध्यें विशेष रस वाटतो त्यांभोंवतीं सर्व शिक्षण केंद्रित करावयाचें असतें. अशा रीतीनें विषयांचें एकत्रीकरण करणें अथवा त्यांचा समवाय साधणें, 'एक-शिक्षकी' शाळेंत फारच उपयुक्त ठरतें. त्यामुळें अमेरिकेंतील छोट्या छोट्या शाळांतून ह्या उपक्रमाला विशेष महत्त्वाचें स्थान मिळूं लागलें आहे. इतिहास, भूगोल, नागरिकशास्त्र हे विषय एक करण्यांत येतात. तसेंच वाचन व इतिहास, वाचन व स्पेलिंग, वाचन व भाषा हे विषय पण एक करण्यांत येतात. निबंधलेखनाची इतिहास, भूगोल अथवा वाचन ह्या विषयांशीं सांगड घालण्यांत येते. ह्या बाबतींत बॉफोर्ड नांवाच्या तज्ज्ञाचें मत असें आहे कीं, अशा रीतीनें विषय एकत्र करण्यापासून शिक्षकाचें काम तर हलकें होतेंच; परंतु विद्यार्थ्यांना पण त्याचा खूप उपयोग होतो. ह्यामुळें विद्यार्थ्यांना अभ्यास कमी करावा लागतो. कोणत्या विषयाची कोणत्या विषयाशीं सांगड घालावी, ह्या बाबतींत कांहीं ठराविक नियम नसल्यामुळें, एथें संशोधनाला व प्रयोगाला भरपूर वाव आहे. 'एक-शिक्षकी' शाळांतील शिक्षण अधिक प्रभावी व कार्यक्षम करण्याच्या दृष्टीनेंच हें संशोधन अथवा प्रयोग व्हावयास पाहिजेत.

अमेरिकेपासून आणखी एक गोष्ट घेण्यासारखी आहे.

एथील अध्यापनशाळा, विश्वविद्यालयें, इतर खाजगी संस्था ह्यांनीं अनेक प्रयोग केले. बरेंच संशोधन केलें. त्याच्या आधारावर ह्या देशांत खूप साहित्य निर्माण झालें आहे. हें सर्व साहित्य छोट्या शाळांतून काम करणाऱ्या शिक्षकांना मोलाची मदत करणारें आहे. ह्या साहित्यामुळें व खास काढलेल्या अभ्यासवर्गामुळें, अमेरिकेंतील शिक्षकाजवळ आपलें काम करण्यासाठीं लागणारी सामुग्री भरपूर प्रमाणांत असते. जगांत इतरत्र लहान शाळांतून काम करणाऱ्या कोणत्याही शिक्षकापेक्षां अमेरिकेंतील शिक्षक, ह्या बाबतींत अधिक भाग्यवान आहे. भारतासारख्या ज्या देशांत 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या नेहमींच मोठी राहणार आहे, त्या देशांना अमेरिकेच्या अनुभवाचा फायदा घेतल्यावांचून चालणारच नाहीं.

## ऑस्ट्रेलिया

ज्या दुसऱ्या एका देशाचा ग्रामीण शिक्षणाचा अनुभव आपणांला विशेष उपयुक्त वाटेल तो देश म्हणजे ऑस्ट्रेलिया. ऑस्ट्रेलिया देशांतील लोकसंख्या एका विशिष्ट रीतीनें विभागलेली आहे. एकंदर खंडांतील लोकसंख्येच्या निम्मी वस्ती सहा प्रदेश राज्यांच्या, राजधानीच्या शहरांत राहात आहे. राहिलेली अर्धी वस्ती सबंध देशांतून अगदीं तुरळक अशी पसरलेली आहे. ही बरीचशी वस्ती ग्रामीण विभागांतच आहे. ह्यामुळें ऑस्ट्रेलियामध्यें 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या



खूपच मोठी आहे. अमेरिकेप्रमाणें ऑस्ट्रेलियांतील प्रातिनिधिक ग्रामीण शाळा ही 'एक-शिक्षकी' शाळाच आहे.

लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे कीं, 'एक शिक्षकी' शाळेविरुद्ध ह्या देशानें केव्हांही मोहीम काढलेली नाहीं. ह्या शाळांबद्दल कुरकुर न करतां त्यांचें अस्तित्व त्यानें मान्य केलें आहे. इतकेंच नव्हे तर ह्या शाळांपासून होणाऱ्या फायद्याचें मुक्त कंठानें त्यांनीं पोवाडे गायिले आहेत. ऑस्ट्रेलियांतील व्हिक्टोरिया प्रांताचे टेट् नांवाचे एक सेवानिवृत्त डायरेक्टर ऑफ एज्युकेशन ह्यांनीं तर ह्या शाळेच्या उपयुक्ततेबाबत पुढील उद्‌गार काढले आहेत. ह्यांचे उद्‌गार हॅटॉग कमिटीनें 'एक-शिक्षकी' शाळेबाबत काढलेल्या उद्‌गारांशीं ताडून पाहणें मोठें उद्‌बोधक ठरेल. श्री. टेट् म्हणतात:—

" कांहीं देशांतील लोकांचा असा समज आहे कीं, ज्या 'एक-शिक्षकी' शाळांमधून एका शिक्षकाला पुष्कळशा इयत्तांना शिकवावें लागतें, त्यांचें काम समाधानकारकपणें चालत नाहीं. अतएव परिस्थिति थोडी अनुकूल झाल्याबरोबर ह्या शाळांचें रूपांतर करून टाकलें पाहिजे.' एक-शिक्षकी' शाळा म्हणून त्या चालू देतां कामा नये. दक्षिण ऱ्होडेशिया व आफ्रिकेंतील कांहीं भाग ह्यांमध्यें ही समजूत विशेष मूळ धरून बसली आहे. अमेरिकेंतील शिक्षणतज्ज्ञांनीं पण तसाच सूर काढल्याचें मला माहीत आहे. ऑस्ट्रेलियांतील अधिका-

त्यांना सर्वसाधारणपणें हें मत मान्य नाहीं. ते असें मानतात कीं, अशा 'एक-शिक्षकी' शाळांची व्यवस्था पाहण्याबाबत ज्या शिक्षकांना योग्य मार्गदर्शन मिळालेलें असतें, त्यांच्या हातून चांगलें काम होऊं शकतें–नव्हे तें चांगलें काम करतातच. ह्या शिक्षकांच्या मार्गदर्शनाखालीं काम करणाऱ्या विद्यार्थ्यांना भोंवतालच्या परिस्थितीमुळें स्वतःच्या अंतःस्फूर्तीवर व प्रयत्नावर जास्त अवलंबून राहावें लागतें. त्यामुळें ज्या शाळेंत पुष्कळ शिक्षक आहेत त्या शाळेंतील मुलांपेक्षां ह्या शाळेंतील मुलें अधिक प्रगति दाखवूं शकतात. तेथील पालकांना 'एक-शिक्षकी' शाळेंत मुलांना दाखल करणें, ही एक मोठी आपत्ति आहे असें कधींच वाटलें नाहीं. उलटपक्षीं, ह्या शाळेंत मुलाला प्रवेश मिळणें ही एक अभिमानाची गोष्ट मानली जाते. इतकेंच नव्हे तर जरूर ती स्पर्धा करून त्या शाळेंत प्रवेश मिळविण्याची लोक खटपट करतात."

ते पुढें म्हणतात, "मी स्वतः ज्यावेळीं व्हिक्टोरिया एथील शिक्षणखात्याचा डायरेक्टर होतों, त्यावेळीं जाणून बुजून माझ्या चारी मुलांना मीं 'एक-शिक्षकी' शाळेंतच घातलें. ही 'एक-शिक्षकी' शाळा एका अध्यापनशाळेला जोडलेली होती. ह्या शाळेंत मुलांना घातल्यामुळें त्यांना घरापासून फार दूर जावें लागे, तथापि मीं मुलांना ह्या 'एक-शिक्षकी' शाळेंतच घातलें; कारण ह्या शाळेची एकूण व्यवस्था व शिक्षण देण्याचें तेथील तंत्र व पद्धति ह्यावर मी निहायत खूष होतों."



श्री. टेट् ह्यांनीं ह्या 'एक-शिक्षकी' शाळांबाबत एक चांगला प्रबंधच तयार केला आहे. 'एक-शिक्षकी' शाळांचा मगदूर फार कमी असतो, सबब त्या शाळा लोकांना प्रिय नसतात, हा सिद्धांतच त्यांना मान्य नाहीं. त्यांचें असें म्हणणें आहे कीं, ज्या कांहीं देशांमध्यें, ह्या 'एक शिक्षकी' ग्रामीण शाळांबाबत प्रतिकूल मत पहावयास मिळतें, त्याचें कारण त्यांच्या मतें ह्या देशांनीं 'एक-शिक्षकी' शाळांकडे जेवढें लक्ष द्यायला पाहिजे तेवढें लक्ष दिलेलें नसतें. आमच्या 'एक-शिक्षकी' शाळांची कार्यक्षमता कमी होण्याचें मुख्य कारण म्हणजे सर्वसाधारण ग्रामीण जीवनाबाबत व विशेषतः ग्रामीण शिक्षणाबाबत आम्ही मंडळी पूर्ण बेदरकार असतों, असें त्यांचें म्हणणें आहे.

ऑस्ट्रेलियांतलि 'एक-शिक्षकी' शाळांतून ज्या शिक्षण-पद्धतींचा स्वीकार केला आहे, त्यांमध्यें 'वर्गनायक पद्धती'ला विशेष स्थान दिलेलें पाहून साश्चर्य आनंद वाटतो. ह्या बाबतींत शिक्षणखात्याचे एक संशोधक व मानसशास्त्रज्ञ श्री. पारकर म्हणतात, "एक-शिक्षकी शाळांमध्यें वर्गनायकाची मदत घेणें अपरिहार्य आहे. हे वर्गनायक वरच्या वर्गांतील विद्यार्थी असतात. त्यांना वाचनासारख्या कांहीं विषयांची देखरेख करण्याकरितां पाठविण्यांत येतें. अशा मुलांच्याकडे हें काम सोंपविल्यामुळें कधीं कधीं वर्गांतील अभ्यासाच्या वेळीं त्यांना गैरहजर राहावें लागतें. पण ह्या बाबतींत त्यांचें

जें कांहीं थोडेंबहुत नुकसान होईल त्याची भरपाई त्यांच्या-मध्यें जबाबदारीची जी जाणीव उत्पन्न होते, त्यामुळें होऊं शकते. आपणांला वर्गनायकासारखें जबाबदारीचें काम करावयास मिळावें म्हणून विद्यार्थी शाळेमध्यें, खूप अभ्यास करून आपली लायकी प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करतात, हा एक निराळाच फायदा आहे. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं, ही वर्गनायक पद्धति लोकमान्य झाली आहे. तिला विरोध करणारा वर्ग आज पण आहेच; परंतु ही पद्धति आज रूढ झाली असून तिला लोकांची मान्यता मिळूं लागली आहे.

ही वर्गनायक पद्धति आज ऑस्ट्रेलियांत चालू आहे. ऐतिहासिक दृष्ट्या पाहिलें तर ही पद्धति भारतांतून ऑस्ट्रे-लियांत, इंग्लंडच्या मार्गें गेली. ही पद्धति आज ऑस्ट्रेलियांतील ग्रामीण शिक्षणाच्या कार्यक्रमाला खूपच साहाय्यकारक ठरली आहे. परंतु ज्या भारतांत ह्या पद्धतीचा जन्म झाला त्या भारतानें मात्र तिला सोडचिठ्ठी दिली आहे.

ऑस्ट्रेलियाचें आणखी एक वैशिष्ट्य आहे. 'एक-शिक्षकी' शाळांच्या दैनंदिन कारभाराबाबत ट्रेनिंग कॉलेजांतील विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केलें जावें, ह्यावर ऑस्ट्रेलियन शिक्षणतज्ज्ञांचा विशेष कटाक्ष आहे. ह्या बाबतींत भारतानें ऑस्ट्रेलियाचें अनुकरण करणें जरुरीचें आहे. ऑस्ट्रेलियांतील ट्रेनिंग कॉलेजांत शिक्षण घेणाऱ्या प्रत्येक शिक्षकाला ग्रामीण शाळा चालविण्याचें तंत्र अभ्यासावेंच लागतें. ह्यासाठीं प्रत्येक



ट्रेनिंग कॉलेजला, एक दोन, 'एक-शिक्षकी' शाळा जोडलेल्या असतात. जीं ट्रेनिंग कॉलेजें शहरांत काम करीत असतात; त्यांना आपल्या विद्यार्थ्यांना 'एक शिक्षकी' शाळेंत काम करण्याचें तंत्र समजावून सांगण्यासाठीं आपल्या कॉलेजला जोडून एकादी (कृत्रिम) 'एक-शिक्षकी' शाळा चालवावी लागते. ह्या शाळेंत भोंवतालच्या विभागांत राहणारे वेगवेगळ्या इयत्तेंतील विद्यार्थी दाखल केले जातात. ह्या दृष्टीनें मेलबोर्न एथील ट्रेनिंग कॉलेजांतील व्यवस्था पाहण्यासारखी आहे. आमच्या देशांतील ट्रेनिंग कॉलेजांतून अशा प्रकारचे यत्न क्वचितच केलेले आढळतील.

अमेरिकेंतील शिक्षकाला एके वेळीं आठ वर्ग सांभाळावे लागतात. ह्या बाबतींत ऑस्ट्रेलियांतील शिक्षक जरासा भाग्यवान आहे. त्याला ६ किंवा ७ च इयत्तांकडे पाहावें लागतें. त्याला जो अभ्यासक्रम शिकवावा लागतो तो मात्र खूप कठीण व व्यापक असा असतो. अमेरिकेंतील शिक्षकांच्या प्रमाणेंच एथील शिक्षकसुद्धां कांहीं इयत्ता एकत्र करून आपलें काम करतो. चांगलें समाधानकारकपणें करतो. हें काम ऑस्ट्रे-लियांतील शिक्षक किती चांगल्या प्रकारें करीत असतो तें श्री. पारकर ह्यांच्या पुढील उद्गारांवरून समजेल. "एकेका शिक्ष-काला ६ ते ७ इयत्तांना शिकवावें लागतें. निरनिराळे विषय वेगवेगळ्या इयत्तांच्या मुलांना एका शिक्षकानें शिकवावयाचें म्हणजे मोठी कठीण गोष्ट आहे. ह्या शाळांना भेट देणाऱ्या

लोकांना ह्या गोष्टीचा मोठा अचंबा वाटतो. हें कसें शक्य आहे असें ते विचारीत असतात. परंतु ह्या देशांतील शेंकडो शाळांतून हें काम फारच चांगल्या रीतीनें होत असल्याचें कोणालाही आढळून येईल.''

अमेरिकेच्याच धर्तीवर ऑस्ट्रेलियांत पण वर्गांचें अथवा विषयांचें एकत्रीकरण करण्यांत येतें. परंतु ह्या देशांत आणखी पण अभिनव गोष्ट केली जाते. ती लक्षांत ठेवण्यासारखी आहे. वेगवेगळे विषय शिकविण्यासाठीं निरनिराळ्या इयत्तांना एकत्र आणण्याची ह्या देशांत पद्धति आहे. कांहीं इयत्तांना इतिहास शिकविण्याच्या वेळीं एकत्र आणतात; तर वाचन शिकविण्यासाठीं दुसऱ्याच इयत्तांना एकत्र करतात. सर्वच विषय शिकविण्याकरितां, कांहीं ठराविक इयत्तांना एकत्र करण्याऐवजीं ठराविक विषय शिकविण्यासाठीं कांहीं वर्गांना एकत्र आणण्याची ही पद्धति अधिक चांगली व फायदेशीर आहे.

शाळांचें केंद्रीकरण करण्याची अमेरिकेंतील चळवळ ऑस्ट्रेलियांत फारशी उचलून धरण्यांत आलेली नाहीं. ह्या बाबतींत वर उल्लेखिलेल्या श्री. टेट् या शिक्षणाधिकाऱ्यांचे उद्गार विचार करण्यासारखे आहेत. ते म्हणतात, "ज्या ठिकाणीं रस्ते चांगले आहेत व वस्ती स्थिरावलेली आहे, त्या ठिकाणींसुद्धां ह्या बाबतींत फारशी प्रगति झालेली नाहीं. शाळेपासून दूर राहणाऱ्या मुलांना शाळेंत जाण्यासाठीं प्रवासभत्ता देण्याचा रिवाज गेलीं ५० वर्षें चालू आहे;



परंतु आपली छोटी 'एक-शिक्षकी' शाळा बंद करून आपल्या मुलांना केंद्र-शाळेंत पाठविण्याची कल्पना ऑस्ट्रेलियांतील पालकांना मानवत नाहीं. ह्या लहान लहान 'एक-शिक्षकी' शाळा चांगल्या पद्धतशीर चालतात. तेथें शिकविण्याचें तंत्र नीटपणें सांभाळलें जातें. शिक्षक चांगले असतात. त्यामुळें सर्वसाधारण पालकांचा ह्या शाळा बंद करण्याला व इतरत्र आपलीं मुलें पाठवायला विरोध असतो. ह्या खेरीज दुसरी पण एक महत्त्वाची गोष्ट ह्या बाबतींत लक्षांत घेण्यासारखी आहे. ही शाळा चालविण्यासाठीं स्थानिक लोकांकडून कांहीं कर वसूल केला जात नाहीं, त्यामुळें ह्या शाळा बंद करून केंद्र-शाळा स्थापन करण्यामुळें सरकारी खर्चाची किती बचत होईल याचा विचार करण्याची लोकांना गरज वाटत नाहीं. त्यांच्या डोळ्यांसमोर एकच गोष्ट प्रामुख्यानें येते ती म्हणजे, जर ही आपली शाळा बंद झाली तर आपल्या मुलांना, थंडी पावसांत, उन्हातान्हांत, रोज कित्येक मैल दूर जावें लागेल. त्यामुळें केंद्र-शाळेंत मुलें पाठवावयाला त्यांचा विरोध असतो. ह्याचा अर्थ असा नाहीं कीं, त्यांच्या गांवाबद्दल त्यांना अवास्तव अभिमान वाटतो, म्हणून ते केंद्र-शाळेंत मुलें पाठवावयाला तयार होत नाहींत. आपल्या छोट्या शाळेवर ते सर्व निहायत खूष असतात, म्हणून ते आपली शाळा बंद करावयाला तयार नसतात. पुष्कळशा शहरी शाळांतून शिकाऊ शिक्षक काम करीत असतात. ह्या उलट खेड्यांतील 'एक-

शिक्षकी' शाळेंत अनुभवी ट्रेंड असा शिक्षक कामावर असतो. शहरी शाळेंत जुन्या नव्या शिक्षकांची भरती झालेली असते. आपला मुलगा शहरी शाळेंत पाठविला तर त्याला शिकाऊ शिक्षकांच्या हाताखालीं राहावें लागेल, त्यापेक्षां त्याला खेड्यांतील अनुभवी शिक्षकांच्या जवळ ठेवणें अधिक चांगलें. ह्या विचारसरणीमुळें पण पुष्कळसे पालक आपलीं मुलें केंद्र-शाळेंत पाठवावयाला तयार होत नाहींत.

हें जरी खरें असलें तरी शाळांच्या केंद्री-करणाच्या योजनेला, आज ना उद्यां एथें अधिक चालना मिळण्याचा संभव वाटतो. ह्या बाबतींत श्री. पारकर म्हणतात, " गेल्या कांहीं वर्षांमध्यें पुष्कळशा मुलांना दूरच्या माध्यमिक शाळां-मध्यें नेण्याची व्यवस्था करण्यांत आली. ज्याप्रमाणें मुलांना माध्यमिक शाळांमध्यें पाठविण्याची सोय झाली. तशीच त्यांना दूरच्या मोठ्या प्राथमिक शाळांमध्यें पाठविण्याची व्यवस्था पण थोड्याच काळामध्यें करतां येणें शक्य आहे. परंतु हें व्हायला अजून अवधि आहे. ऑस्ट्रेलियापासून आज आपणांला एकच धडा घेतां येण्यासारखा आहे. तो म्हणजे जर आपल्या ' एक-शिक्षकी ' शाळा जास्त कार्यक्षम होऊं शकल्या तर आपणांस शाळांच्या केंद्रीकरणाच्या चळवळीची घाई करावी लागणार नाहीं. भारतासारख्या दरिद्री देशाला शाळांच्या केंद्री-करणाच्या कार्यक्रमाला फारसा उत्साहानें हात घालतां येणार नाहीं. कारण पैशाचा विचार केला तर



आपणांस तो कार्यक्रम परवडणार नाहीं. अतएव ऑस्ट्रेलि-यांतील 'एक-शिक्षकी ' शाळेचा अनुभव मोलाचा मानून त्याकडे दुर्लक्ष न करण्याची आपण काळजी घेतली पाहिजे

## स्वीडन

स्वीडन हा देशपण खेडेगांवांनींच भरलेला आहे. ह्या देशाच्या एकूण लोकसंख्येपैकीं दोन तृतीयांश लोक खेड्यांतून राहात आहेत. कांहीं कांहीं भागांतून तर ही लोकवस्ती अगदीं तुरळक व विखुरलेली आहे. अमेरिका व ऑस्ट्रेलिया ह्या देशांप्रमाणें स्वीडनला सुध्दां पुष्कळशा 'एक-शिक्षकी' शाळाच चालवाव्या लागतात. गेल्या कित्येक वर्षांत ह्या देशांनीं शिक्षणक्षेत्रांत खूप प्रयोग केले. ह्या प्रयोगांतून विविध प्रकारच्या 'एक-शिक्षकी' शाळा जन्माला आल्या. कु. शाट्झमन नांवाच्या बाईनें स्वीडनमधील वेगवेगळ्या ग्रामीण शाळांचें फार चांगलें वर्णन केलें आहे. त्या शाळांच्या वेगवेगळ्या प्रकारांविषयीं व त्यांच्या कार्याविषयीं पुढें थोडक्यांत माहिती दिली आहे.

' अ ' शाळाः— ह्या शाळांतील ६ किंवा ७ इयत्तांना एकच शिक्षक असतो.

ब १ शाळाः— ह्या शाळेंत एकूण तीन शिक्षक असतात. पहिली व दुसरीला एक शिक्षक, तिसरी व चौथीला एक शिक्षक. पांचवी व सहावीला एक शिक्षक. हे सर्व शिक्षक शाळेंतच अथवा शाळेजवळ राहतात.

**ब २ शाळा**:—ह्या शाळेंत सर्व इयत्तांना मिळून एकच शिक्षक असतो. परंतु पहिल्या इयत्तेंत दरवर्षी मुलें दाखल न करतां त्यांना दर दोन वर्षांनीं घेण्यांत येतें. ह्यायोगें वर्गांतील गर्दी टाळतां येते.

**ब ३ शाळा**:—ह्या शाळेंत सर्व इयत्तांना मिळून एकच शिक्षक असतो. परंतु पहिल्या इयत्तेंत दरवर्षी मुलांना दाखल न करतां एक वर्षाआड त्यांना दाखल करण्यांत येतें. ह्यामुळें एका वर्षी शिक्षकाला पहिली, तिसरी व पांचवी इयत्ता शिकवावी लागते, तर पुढील वर्षी त्याला दुसरी, चौथी व सहावी शिकवायला मिळते. कांहीं मुलें जर वरच्या वर्गांत जाण्याच्या लायकीचीं नसलीं तर मात्र त्या शिक्षकाला, चार पांच इयत्ता सांभाळाव्या लागतात. परंतु ह्यामुळें रोजच्या व्यवस्थेंत मोठा गोंधळ निर्माण होतो असें होत नाहीं.

**क १ शाळा**:—ह्या शाळेंत एकच शिक्षक असतो; परंतु एथें दुवक्त पद्धति चालते. मोठीं मुलें सकाळीं शाळेंत येतात. छोटीं दुपारीं येतात.

**क २ शाळा**:—ह्या शाळेंत पण एकच शिक्षक असतो. मुलें मात्र दोन भागांत विभागलेलीं असतात. एक समूह सोमवार, बुधवार व शुक्रवारीं शाळेंत येतो व दुसरा समूह मंगळवार, गुरुवार व शनिवारीं शाळेंत येतो.

**ड १ शाळा**:—ह्या शाळेंत पण एकच शिक्षक असतो. हे शिक्षक वर्षाच्या प्रारंभीं दोन महिने व वर्षाअखेरचे दोन



महिने पहिली व दुसरी ह्या इयत्तांना शिकवितात. ज्या महिन्यांत त्यांना शाळा नसते तेव्हां दर शनिवारीं तीं मुलें शाळेंत येतात व त्यांची उजळणी घेतली जाते. १ ली व २ री सोडून बाकीच्या चार इयत्तांचीं मुलें, सारा आठवडाभर व वर्षांतून सर्व महिने शाळेंत येतात.

वरील माहितीवरून हें लक्षांत येईल कीं, ग्रामीण शाळेंतील एकाकी शिक्षकाला सांभाळाव्या लागणाऱ्या वर्गांची संख्या कमी करण्यासाठीं स्वीडननें किती विविध प्रकारच्या आकर्षक पद्धति शोधून काढल्या आहेत. ह्या सर्व पद्धतींमध्यें आपणांस घेतां येण्यासारखी पद्धति म्हणजे दुवक्त पद्धति. ह्या खेरीज एक वर्षाआड नवीं मुलें घेण्याची पद्धति पण विचार करण्यासारखी आहे.

ह्या प्रश्नांबाबत इतर कांहीं देशांनीं सुद्धां खूप विचार केला आहे. त्यामध्यें कॅनडा, दक्षिण आफ्रिका व न्यूझीलंड ह्यांचा उल्लेख केला पाहिजे. ह्या बाबतींत आशियांतील चीन तुर्कस्तान ह्या देशांनींही कांहीं प्रयोग केले असतीलच. कारण ह्या देशांना देखील ग्रामीण शिक्षणाचा प्रश्न सोडविण्याची तीव्रतेनें गरज भासूं लागली आहे. ह्या लोकांनीं केलेल्या प्रयोगांच्या यशापयशाची नोंद कोठें पुस्तकांतून दाखल झालेली नाहीं. परंतु ह्या देशांतील एकूण वातावरण व आपल्या देशातील वातावरण ह्यांमध्यें कल्पनातीत साम्य आहे. त्यामुळें त्यांनीं केलेल्या प्रयोगांचे आपल्या राज्य-

कर्त्यांना विशेष महत्त्व वाटेल. दुर्दैवाची गोष्ट अशी आहे कीं, आजपर्यंत भारतानें इंग्लंडचाच कित्ता आपल्या डोळ्यां-समोर ठेवून आपला शैक्षणिक कार्यक्रम आंखला होता, त्यामुळें ग्रामीण शिक्षणाच्या–विशेषत: ' एक-शिक्षकी ' शाळांच्या–प्रश्नाकडे आपलें कमालीचें दुर्लक्ष झालें. कारण इंग्लंड हा शहरप्रधान देश असल्यामुळें त्या देशाला ह्या ग्रामीण शिक्षणाबाबत विचार करण्याची गरजच वाटली नाहीं. आणि आम्हीं तर आमची पावलें इंग्लंडच्याच पावलावर टाकावयाची संवय लावून घेतली होती. इंग्लंडच्या बरोबर बांधलेली ही आपली लग्नगांठ पुष्कळशी सैल झाल्यामुळें आतां आपण आपल्या जीव-नांत आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन आणावयाला शिकलें पाहिजे व आपले आदर्श ठरविण्यासाठीं जगांतील इतर देशांकडे नजर फेंकावयास शिकलें पाहिजे. असें करण्याची आपण संवय लावून घेतली तर अमेरिका, ऑस्ट्रेलिया, स्वीडन ह्यांसारख्या देशांनीं आपल्या 'एक-शिक्षकी' शाळा सुधारण्याकरितां काय केलें ह्याचा आपणांला काळजीपूर्वक अभ्यास करावा लागेल व अशा रीतीनें आपल्या छोट्या ग्रामीण शाळांचा मगदूर सुधारण्याच्या दृष्टीनें आपणांस आपलीं पहिलीं पावलें जपून पण निर्धारानें टाकावीं लागतील.

———

# : ४ :

## कारभारासंबंधीचे महत्त्वाचे प्रश्न

'एक शिक्षकी' शाळा संबंधींची ऐतिहासिक पार्श्वभूमि ह्या पूर्वी निवेदन करण्यांत आली. इतर देशांतील 'एक-शिक्षकी' शाळांबाबत तुलनात्मक माहिती पण देण्यांत आली. आतां चालू प्रकरणांतून ह्या शाळांसंबंधीं नेहमीं उत्पन्न होणाऱ्या कांहीं महत्त्वांच्या प्रश्नांविषयीं चर्चा करणें जरूर आहे. हे प्रश्न मुख्यत: दोन प्रकारचे असतात. ( १ ) कारभारविषयक प्रश्न ( २ ) शैक्षणिक प्रश्न. ह्यांपैकीं पहिल्या सदरांत, साधारणपणें पुढील सहा बाबींचा समावेश होतो. ( १ ) 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या कमी करणें. ( २ ) ह्या शाळांतील शिक्षकांच्या नेमणुका व बदल्या करणें. ( ३ ) येथील शिक्षकांच्या रजा मंजूर करणें–रजेच्या मुदतींत बदली, दुसरा शिक्षक नेमण्याची व्यवस्था करणें. ( ४ ) ह्या शिक्षकांसाठीं अभ्यास-वर्ग भरविणें. ( ५ ) ह्या शाळांमध्यें दाखल होणाऱ्या नव्या विद्यार्थ्यांवर कांहीं निर्बंध घालणें. ( ६ ) ह्या शाळांवर देखरेख ठेवणें. ह्या प्रकरणांतून ह्या सर्व प्रश्नांची सविस्तर चर्चा करण्याचा प्रयत्न आम्ही करणार आहोंत.

**( १ ) 'एक-शिक्षकी ' शाळांची संख्या कमी करणें–**

'एक-शिक्षकी' शाळा चालविणें, ही एक अमेरिकेंतील लोकांना आपत्ति वाटते. आणि ही अटळ अशी आपत्ति आहे, असें त्यांचें मत आहे. ऑस्ट्रेलियन लोकांचें मत असें आहे कीं, 'एक-शिक्षकी' शाळा ह्या आमच्या सर्व शैक्षणिक कार्यक्रमाचा एक अविभाज्य असा घटक आहे. ह्या शाळांमध्यें कांहीं गुण आहेत तसे कांहीं दोष पण आहेत. एका बाबतींत मात्र ऑस्ट्रेलियांत काय, अमेरिकेंत काय किंवा इतरत्र काय, सर्वांचें ऐकमत्य आहे. सर्वांना वाटतें कीं, ह्या 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या जितकी कमी करतां येईल तितकी ती कमी करण्याचा प्रयत्न करणें जरुरीचें आहे.

**(अ) नागरी विभागांतील व मोटमोठ्या खेड्यांतील 'एक-शिक्षकी' शाळा—** आपला असा समज आहे कीं, 'एक-शिक्षकी' शाळा, ह्या केवळ खेड्यांतूनच पाहायला मिळतात, हा आपला समज साफ चुकीचा आहे. ह्या शाळा सर्व ठिकाणीं असूं शकतात. त्या जशा खेड्यांत आहेत, तशा त्या मोठ्या गांवांत व लहान वा मोठ्या शहरांमध्येंमुद्धां असूं शकतात. ह्यांपैकीं कांहीं कांहीं गांवांची संख्या इतकी मोठी असते कीं, त्याठिकाणीं फक्त बहुशिक्षकी शाळाच स्थापन करण्यास हरकत नसते. ज्या गांवाची लोकसंख्या ५०० आहे. त्या गांवांतील शाळेंत साधारणपणें ७५ मुलें दाखल व्हायला हरकत नाहीं. अशा शाळेंत दोन शिक्षकांची नेमणूक करणें आर्थिक दृष्ट्या पण शक्य आहे. अतएव



आपणांला सर्वसाधारणपणें असें म्हणतां येईल कीं, ज्या गांवांची लोकसंख्या ५०० (किंवा त्याहून अधिक) आहे, त्या गांवामध्यें 'एक-शिक्षकी' शाळा असतां कामा नये; परंतु आजची परिस्थिति मात्र अगदीं वेगळी आहे. मुंबई सारख्या ३० लाख वस्तीच्या शहरांत मुद्धां आपणांला आज 'एक-शिक्षकी' शाळा सर्वत्र पाहायला मिळतात.

आज ह्या ज्या 'एक-शिक्षकी' शाळा सर्वत्र पाहायला मिळतात, त्याचें एक कारण म्हणजे, आपल्या देशांत आढळणारें भाषा-वैचित्र्य. एकादें उदाहरण देऊन हें जास्त स्पष्ट करतां येईल. समजा, एकाद्या गांवाची लोकसंख्या २००० आहे. परंतु ह्या गांवांत मुसलमानांचीं घरें फक्त ३०।४० च आहेत. ह्या मुसलमानांची भाषा उर्दू असल्यामुळें त्यांच्या मुलांना उर्दूमध्यें शिक्षण देण्याची व्यवस्था करावयाची आहे. ह्या थोड्या मुसलमानांच्या मुलांसाठीं जी शाळा चालवावी लागेल, ती शाळा, 'एक-शिक्षकी' शाळाच राहील. त्याचप्रमाणें ज्या कांहीं गांवांत दोन दोन भाषा प्रचलित आहेत, त्या ठिकाणीं, त्या प्रदेशांतील मुख्य भाषेखेरीज दुसरी भाषा बोलणारे जे लोक असतील, त्यांची संख्या नेहमीं कमीच राहणार. आपल्या मुलांना त्यांच्या मातृभाषेंतच शिक्षण मिळावें असा ह्या लोकांचा आग्रह असणारच. अशा प्रकारच्या शाळेला जगण्याचा न्याय्य हक्क आहे. इतकेंच नव्हे तर सार्वजनिक निधींतून मदत मिळविण्याचापण त्या शाळेचा

हक्क आहे. ह्या अशा ठिकाणची ही शाळा जरी 'एक-शिक्षकी' शाळा असली तरी त्या शाळेला जिवंत ठेवून तिला त्या मुलांसाठीं काम करण्याची संधि दिली पाहिजे.

मोठमोठ्या शहरांमध्यें, कधीं कधीं, ह्या 'एक-शिक्षकी' शाळा कांहीं कारणांमुळे जन्माला येतात कीं, ज्या कारणांचें कोणत्याही सबबीवर समर्थन करणें शक्य नसतें. विशेषतः कांहीं खाजगी शाळांबाबत ही परिस्थिति पाहायला मिळते. एकाद्या मोठ्या शहरांतील, एकाद्या विशिष्ट भागांत, एकादी खाजगी शाळा काढण्यांत येते. ही शाळा एका खाजगी व्यक्तीच्या मालकीची असते. शिक्षकांच्या पेशांत वावरणारा एकादा इसम ही शाळा काढतो व तो त्या भागांतील पालकांना भेटून त्यांचीं मुलें बोर्डाच्या अथवा नगरपालिकेच्या शाळांत न पाठवितां, आपल्या शाळेंत पाठविण्यासाठीं त्यांना गळ घालतो. त्या ठिकाणीं दुसरी बोर्डाची अथवा नगरपालिकेची शाळा असल्यामुळे ह्या शाळेंत फारशीं मुलें येत नाहींत व ही शाळा 'एक-शिक्षकी' शाळा म्हणूनच चालते. शिक्षणाच्या क्षेत्रांत खाजगी व्यक्ति अथवा संस्थांच्या प्रयत्नांना वाव देणें जरी जरुरीचें असलें, तरी वर उल्लेखिलेल्या शाळांबाबत मात्र सरकारनें निर्बंध घालणें अत्यंत जरुरीचें आहे. सरकारनें असा नियम केला पाहिजे कीं मोठ्या शहरांत, ज्या ठिकाणीं बहुशिक्षकी शाळा स्थापन करण्याइतकी लोकवस्ती आहे त्याठिकाणीं दोहोंपेक्षां अधिक



वर्ग शिकविणाऱ्या 'एक-शिक्षकी' शाळेला सरकारी मान्यता देण्यांत येणार नाहीं, असा नियम जर केला तर त्या नियमामुळें कोणत्याही व्यक्तीला खाजगी शाळा काढण्यास बाध येणार नाहीं. त्याच्यावर फक्त नियंत्रण राहील. जर चार वर्ग शिकविणारी शाळा चालवावयाची असेल तर त्याला दुसरा शिक्षक मदतनीस म्हणून नेमावा लागेल; आणि जर एकच शिक्षक त्या शाळेंत काम करणारा असेल तर दोहोंपेक्षां अधिक इयत्ता त्याला तेथें शिकवितां येणार नाहींत. ह्या नियमाची जर कसोशीनें अंमलबजावणी केली तर त्यामुळें शिक्षणक्षेत्रांत काम करणाऱ्या खाजगी व्यक्तींना किंवा संस्थांना कोणताही त्रास पोहोंचणार नाहीं व शिक्षणाचा मगदूर पण त्यामुळें सुधारेल.

शहरी विभागांत व शहरवजा मोठ्या खेड्यांत ज्या 'एक-शिक्षकी' शाळा दिसतात, त्याला दुसरें एक कारण म्हणजे, मुलांसाठीं व मुलींसाठीं वेगवेगळ्या शाळा चालविण्याची आपली प्रथा. प्राथमिक शाळेंतसुद्धां आपण सर्रास सहशिक्षण सुरू केलेलें नाहीं. मुलींसाठीं अजून आपण वेगळ्या शाळा चालवितो. ह्याचा परिणाम असा होतो कीं, आज आपणांला अशी शेंकडों गांवें दाखवून देतां येतील कीं ज्या ठिकाणीं मुलांसाठीं बहुशिक्षकी शाळा असल्या तरी खास ह्या ठिकाणीं मुलींसाठीं 'एक-शिक्षकी' शाळा चालविण्यांत

येते. कारण शाळेंत जाणाऱ्या मुलींची संख्या नेहमींच अपुरी आढळते. आपण जर सहशिक्षण देण्याचा उपक्रम सर्व ठिकाणीं सुरू केला तर, अशा ठिकाणीं दिसणाऱ्या 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या आपोआपच कमी होईल. मुलींसाठीं स्वतंत्र शाळा सुमारें १०० वर्षांपूर्वीं काढण्यांत आल्या होत्या. त्यावेळीं मुलींना शिक्षण देण्यालाच लोकांचा विरोध होता. मुलांच्या शाळेंत मुली पाठवायला तर प्रचंडच विरोध होता. गेल्या कित्येक वर्षांत देशांतील सामाजिक परिस्थिति खूपच बदलली आहे. मुलींच्या शिक्षणाला होणारा विरोध आतां पूर्ण थंडावला आहे. प्राथमिक शाळेंत मुलांमुलींना एकत्र शिक्षण देण्याला आज शहरांत तरी कोणाचा विरोध नाहीं. खेडेगांवांतून सुद्धां आतां हा विरोध फारसा शिल्लक राहिलेला दिसत नाहीं. प्राथमिक शाळांतून सहशिक्षण देण्याचें धोरण आंखण्याची वेळ आज आलेली आहे. त्रावणकोर प्रदेशांत तर ही सुधारणा स्वीकृत झाली आहे व प्रयोगाअंतीं ती फायदेशीर असल्याचें त्यांना दिसून आलें आहे.

१९५०–५१ सालापासून मुंबई शहरांत पण ही प्रथा सुरू झाली. ह्या दृष्टीनें लोकमत तयार करण्यासाठीं योग्य असा शैक्षणिक प्रचार करण्यांत आला. सर्व प्राथमिक शाळांतून सहशिक्षण सुरू करणें व पुष्कळशा शाळांतून संमिश्र शिक्षक नेमणें आज शक्य आहे. ही सहशिक्षण देण्याची सुधारणा जर आपण स्वीकारली तर त्यामुळें 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या आपणांस खूपच कमी करतां येणें शक्य होईल. ह्या खेरीज सहशिक्षणाचे दुसरे पण कित्येक फायदे आहेतच. ह्यामुळें आपल्या देशांतील शैक्षणिक पुनर्रचनेचा ज्या ज्या वेळीं, विचार करण्यांत येईल, त्या त्या वेळीं ह्या सहशिक्षणाच्या प्रश्नाला महत्त्वाचें स्थान, आपणांस द्यावें लागेल.

'एक-शिक्षकी' शाळा जन्माला येण्याचें आणखी एक कारण म्हणजे प्राथमिक शिक्षणाच्या क्षेत्रांत असणारा, सक्तीचा अभाव. ज्या भागाची लोकसंख्या ५०० हून जास्त पण हजारापेक्षां कमी आहे, तेथें सक्तीच्या अभावाचे परिणाम विशेष स्पष्टपणें पाहायला मिळतात. शाळेंत मुलें पाठविणें हें पालकांच्या मर्जीवर अवलंबून असल्यामुळें ह्या भागांतील शाळांमध्यें हजेरीचें प्रमाण ३० ते ५० असें असतें. त्यामुळें एका शिक्षकावर येथील शाळा चालू शकते. ह्या भागांत जर सक्ति लागू केली तर हें हजेरीचें प्रमाण एकूण लोकसंख्येच्या १५ टक्केपर्यंत (निदान १२॥ टक्केपर्यंत तरी) निश्चित वाढूं शकेल. ह्याचा अर्थ असा कीं, ह्या सर्व शाळामध्यें मुलांची संख्या, कमीत कमी ७० राहील व इतकी संख्या राहिली तर, ह्या शाळांना दोन किंवा अधिक शिक्षक सहज देतां येतील. ह्या विभागांतील 'एक-शिक्षकी' शाळा कमी करण्याचें एक प्रभावी साधन म्हणजे सक्तीच्या शिक्षणाची योजना सर्वत्र लागू करणें.

वर सांगितलेल्या तीन उपाय योजनांची जर चांगली

अंमलबजावणी झाली तर मोठ्या व छोट्या शहरांतून व ५०० च्या पेक्षां जास्त वस्ती असणाऱ्या खेड्यांतून, दोहों-पेक्षां अधिक इयत्ता शिकविणाऱ्या, ' एक-शिक्षकी ' शाळांची संख्या कमी करणें सहज शक्य होईल. अपवाद म्हणून एखाद्या विभागांत राहणाऱ्या अल्पसंख्यांक लोकांच्या मुलांना त्यांच्या मातृभाषेंतून शिक्षण देणाऱ्या ' एक-शिक्षकी ' शाळा मात्र शिल्लक राहतील. ह्या वर उल्लेखिलेल्या भागांतून जर ' एक-शिक्षकी ' शाळांची संख्या आपण कमी करूं शकलों तर ती पण एक अभिमान बाळगण्यासारखी गोष्ट होईल. अशा प्रकारच्या गांवांची संख्या जरी कमी दिसली तरी आपली ८० टक्के लोकवस्ती ह्याच गांवांतून विभागलेली असल्यामुळें आपल्या ह्या योजनांचा फायदा पुष्कळ लोकांना मिळूं शकेल.

[ब] ५०० पेक्षां कमी लोकसंख्या असणाऱ्या गांवांतील 'एक-शिक्षकी' शाळाः—५०० पेक्षां कमी लोकसंख्या असणाऱ्या गांवांचा जेव्हां आपण विचार करतों तेव्हां मात्र ह्या गांवांत मुख्यतः, 'एक-शिक्षकी' शाळाच राहतील असें दिसून येतें.

ह्या असल्या गांवांतूनच हॅर्टाग कमिटीच्या शिफारशी-प्रमाणें शाळांच्या एकत्रीकरणाचा प्रयोग हाताळलेला होता. ह्या योजनेप्रमाणें, एखाद्या निवडक गांवांत, कमीत कमी दोन शिक्षकांची शाळा काढावयाची; व ह्या शाळेमध्यें ज्या



गांवांना अशी दोन-शिक्षकी शाळा देतां येणें शक्य नाहीं, अशा भोंवतालच्या गांवांतून, रोज मुलें आणावयाचीं. तत्त्वतः ही योजना ठीक दिसली, तरी ही योजना व्यवहारांत उतरूं शकली नाहीं. ह्याचें मुख्य कारण म्हणजे भोंवतालच्या गांवांतून मुलांची रोज ने-आण करण्याची कांहीं सोय करण्यांत आली नव्हती. अमेरिकेंत ही योजना फार मोठ्या प्रमाणांत लागू करण्यांत आली होती; परंतु ती योजना स्वीकारण्यापूर्वी मुलांची ने-आण करण्याची व्यवस्था करण्यांत आली, किंबहुना ही व्यवस्था झाल्यावरच ही योजना तेथें लागू करण्यांत आली. आमच्या राज्यकर्त्यांनीं ही योजना स्वीकारली; परंतु त्या योजनेंतील जो खर्चाचा भाग म्हणजे, मुलांच्या वाहतुकीची व्यवस्था करणें, तेवढा त्यांनीं टाळला. एका गांवची मुलें दुसऱ्या गांवांतील शाळेंत चालत जातील, असें त्यांना वाटलें. आमच्या देशांतील प्रौढ जर शहाणे असते व शिक्षणाचें महत्त्व जर त्यांना पटलें असतें, तर आमच्या राज्यकर्त्यांची ही अपेक्षा पूर्ण झाली असती. आज आमच्या देशांत अशी परिस्थिति आहे कीं, पालक आपल्या मुलांना शाळेंत पाठवायला तयार नाहींत व मुलें पण शाळेंत जाण्यास फारशीं उत्सुक नाहींत. ह्यामुळें ही अमेरिकेंतील शाळांच्या एकत्रीकरणाची योजना आपल्या येथें यशस्वी होऊं शकली नाहीं. ती यशस्वी न होण्याचें मुख्य कारण मुलांना शाळेंत नेण्या-आणण्याचा प्रश्न सरकारनें हातीं घेतला

नाहीं. ( आमच्या देशाची परिस्थिति लक्षांत घेतली तर, हा प्रश्न हातीं घेणें, आपल्या सरकारला सहसा शक्य होईल, असें वाटत नाहीं.)

ह्या योजनेची एक सुधारलेली आवृत्ति पंजाबमध्यें शोधून काढण्यांत आली. पंजाबमध्यें भाग-शाळा स्थापन करण्याची मोहीम निघाली. ह्या योजनेचें, 'शाही शेतकी कमिशन'नें व हॅार्टाग कमिटीनें कौतुक केलें होतें. ह्या योजने-प्रमाणें एकाद्या निवडक गांवांत एक मोठी अथवा मध्यवर्ति शाळा स्थापन करावयाची व त्या शाळेच्या शाखा म्हणून भाग-शाळा, आजूबाजूच्या गांवांतून उघडावयाच्या. ही मध्यवर्ति शाळा, बहुशिक्षकी शाळा असेल व ह्या भाग-शाळा 'एक-शिक्षकी' शाळा राहतील; व ह्या भाग-शाळेंत फक्त दोनच इयत्ता शिकविण्याची सोय केली जाईल. ह्या योजनेमुळें कित्येक गोष्टी एकदम साधणें शक्य होतें. जीं छोटीं छोटीं मुलें असतात, त्यांचें शिक्षण त्यांच्या गांवांतच होतें. मध्यवर्ति शाळेंत जाण्यासाठीं त्यांना चालावें लागत नाहीं. [ जीं मुलें मोठीं असतात, त्यांना थोडें अंतर चालून मध्यवर्ति शाळेंत जाणें कठीण होणार नाहीं, असें मानलें जातें. ] दुसरी गोष्ट म्हणजे 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्ष-काला एका वेळीं दोहोंपेक्षां जास्त वर्ग संभाळावे लागत नाहींत. ह्यामुळें ह्या शाळांचा मगदूर चांगला राहूं शकतो. तिसरी गोष्ट म्हणजे भाग-शाळा. ही स्वतंत्र शाळा मान-



ण्यांत येत नाहीं. मध्यवर्ति शाळेचाच तो एक घटक मानला जातो व त्या शाळेच्या संपूर्ण नियंत्रणाखालीं ही भाग-शाळा चालते. मध्यवर्ति शाळेची सारखी देखरेख असल्यामुळें, भाग-शाळेला खूप फायदा होतो. त्यामुळें ह्या ' एक-शिक्षकी भाग-शाळांना ' आपला दर्जा चांगला ठेवणें शक्य होतें.

ह्या योजनेला पण कांहीं लोकांचा विरोध आहे. ते म्हणतात, ह्या योजनेमुळें पुष्कळशा अपूर्ण शाळा जन्माला येतात. ह्या शाळांतून पूर्ण चार इयत्तांपर्यंतचें शिक्षण मिळण्याची सोय नसल्यामुळें ह्या शाळांना अपूर्ण शाळा म्हणण्यांत येतें. दोन इयत्तांपर्यंतचें शिक्षण संपूर्ण साक्षरता देण्यास असमर्थ ठरतें. फक्त दोन इयत्ताच शिकून जीं मुलें बाहेर पडतात, त्यांचें शिक्षण जर पुढें चालूं राहिलें नाहीं [ बहुधा तें राहात नाहीं ] तर हीं मुलें लहानपणीं जें थोडेंबहुत शिकतात, तें सर्व विसरून जातात. शिक्षणक्षेत्रांतील ही गळती थांबविण्या-साठीं ह्या अपूर्ण शाळा बंद केल्या जाव्यात असें मानण्यांत येतें. भाग-शाळा चालविल्यामुळें, मुलांचें शिक्षण अपूर्ण राहातें. कालांतरानें तीं साफ निरक्षर होतात. त्यांच्यावर केलेला खर्च फुकट जातो. एक संकट टाळायला जावें तर दुसरेंच पुढें उभें राहतें !

पंजाबमध्यें ह्या प्रयोगाला भरपूर वाव देण्यांत आला. ह्या प्रयोगाचा उल्लेख करतांना, अशा प्रकारच्या २७०७ शाळा पंजाबमध्यें होत्या, असा गौरवपूर्ण निर्देश हॅार्टाग

कमिटीनें केला आहे. परंतु हा प्रयोग यशस्वी झाला नाहीं. तो अयशस्वी म्हणून सोडून देण्यांत आला; ह्या प्रयोगाची शिफारस करतांना, हॅर्टॉग कमिटीनें जो उत्साह दाखविला, तो उत्साह आतां कोणाजवळ राहिला नाहीं. 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या कमी करण्याचा एक खात्रीलायक उपाय म्हणून ह्या प्रयोगाचें महत्त्व आज मुळींच राहिलेलें नाहीं.

ह्या योजनेचा एक चांगला उपयोग करून घेतां येणें शक्य आहे. ह्या योजनेप्रमाणें लहान लहान खेड्यांतील शाळांना वरचे वर्ग देण्याची सोय करतां येईल. अजून कित्येक वर्षेंपर्यंत तरी, सर्व खेड्यांतून सात इयत्तापर्यंतचें शिक्षण देण्याची सोय करतां येणें शक्य होणार नाहीं. (सात इयत्तांचे शिक्षण देण्यासाठीं दोन किंवा तीन शिक्षकांची तरतूद करावी लागेल.) आपली शिक्षणप्रसाराची जी मोहीम आपण सुरू केली आहे, त्या मोहिमेला थोडी मुरड घालणें जरुरीचें आहे. तूर्त कांहीं वर्षें तरी प्रत्येक खेड्याला ४ किंवा ५ इयत्तेपर्यंतचें शिक्षण देणारी शाळा, देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. पुढील तीन इयत्ता शिकविण्याची जबाबदारी मध्यवर्ति शाळेवर सोंपविण्यांत यावी. ह्या मध्यवर्ति शाळेची निवड मात्र खूप काळजीपूर्वक केली जावी. ज्या खेड्यामध्यें ही मध्यवर्ति शाळा स्थापन करण्यांत येईल तें खेडें इतर भोंवतालच्या खेड्यांपासून तीन मैलांपेक्षां जास्त दूर असतां कामा नये. ह्या मध्यवर्ति शाळेंत ५, ६, ७ ह्या वरच्या तीन



इयत्ता शिकविण्याची सोय झाली तर त्याचा फायदा आजू-बाजूच्या गांवांना सहज घेतां येईल. ह्या योजनेप्रमाणें खेड्यां-तील प्रत्येक प्राथमिक शाळेला चार इयत्तांपर्यंतचें, साक्षरतेचें शिक्षण, देतां येईल व पुढील तीन इयत्तांकरितां शाळांचें एकत्रीकरण करणें शक्य होईल. ह्या सात इयत्तांचें शिक्षण देणाऱ्या शाळेला मध्यवर्ति शाळा मानून, भोंवतालच्या चार इयत्ता शिकविणाऱ्या शाळांवर देखरेख करण्याचा अधिकार ह्या मोठ्या शाळेला देतां येईल व बाकीच्या शाळा 'भाग-शाळा' मानल्या जातील. 'एक-शिक्षकी' शाळांचा प्रश्न हाताळीत असतांना ओघाओघानें उपस्थित झालेल्या 'भाग शाळां' बाबतच्या कांहीं बाबींचा आपण विचार केला. कांहीं मर्यादित प्रमाणांत ह्या भाग-शाळांचा उपयोग होईल, हें खरें; परंतु भारतांतील ग्रामीण शिक्षणाचा प्रश्न सोडविण्याच्या कामीं, ह्या 'भाग-शाळांचा' उपयोग होईल असें आम्हांस वाटत नाहीं.

५०० पेक्षां कमी वस्तीच्या गांवांसाठीं काढाव्या लाग-णाऱ्या 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या कमी करतां येणें शक्य आहे. त्यासाठीं दोन गोष्टी केल्या पाहिजेत. (१) त्या भागांची शैक्षणिक दृष्टया पाहणी करणें. ह्या बाबतींत १९१२ सालापासून प्रांतीय सरकारना सूचना करण्यांत आल्या. परंतु फारच थोड्यांनीं ह्या कामीं लक्ष घातलें. ही जर शैक्षणिक पाहणी नीटपणें करण्यांत आली तर कोणत्या ठिकाणीं शाळा

काढल्या तर त्या सोयीच्या होतील हें नक्की ठरवितां येईल व अनावश्यक शाळा काढून होणाऱ्या खर्चाची बचत करतां येईल. ह्यामुळें नीट चालू शकतील अशाच ठिकाणीं शाळा निघतील. अतएव प्रत्येक प्रदेश सरकारनें ह्याप्रमाणें आपल्यां विभागाची शैक्षणिक पाहणी शक्य तितक्या लवकर करून घेणें जरुरीचें आहे. (२) ह्या बाबतींत करण्यांत आलेली दुसरी सूचना थोडीशी धक्का देणारी वाटेल. कांहीं लोकांचें असें म्हणणें आहे कीं आपणांकडे जीं छोटीं खेडीं पसरलेलीं आहेत त्यांचें एकत्रीकरण करावें व अशाप्रकारें ५०० किंवा त्यापेक्षां जास्त वस्तीचीं खेडीं बनवावीं. ह्या लोकांचें म्हणणें आहे कीं, लहानसान खेड्यांना जशी पूर्ण शिक्षण देऊं शकणारी शाळा हवी असते, त्याचप्रमाणें, त्यांना पिण्याच्या पाण्यासाठीं विहीर पण हवी असते. आपल्या गांवचा मोठ्या सडकेशीं संबंध जोडणारा एकादा रस्ता त्यांना हवा असतो; त्याचप्रमाणें माणसांच्या व जनावरांच्या औषधपाण्याची सोय व्हावी, असें पण त्यांना सारखें वाटत असतें; इतकेंच नाहीं तर आपल्या संरक्षणासाठीं पोलिसांची पण त्यांना जरुरी वाटते. प्रत्येक खेड्याला आवश्यक वाटणाऱ्या ह्या किमान सुखसोयींची तरतूद करण्याचें जर ठरलें तर त्यासाठीं नित्य व नैमित्तिक अशा फार मोठ्या खर्चाची तरतूद सरकारला करावी लागेल. कोणत्याही सरकारला एवढा मोठा खर्च परवडणार नाहीं. लोकांना ह्या सर्व गोष्टी जर मिळवून



द्यावयाच्या असतील तर आजचीं हीं जीं विखुरलेलीं छोटीं खेडीं आहेत तीं त्या ठिकाणाहून उचललीं पाहिजेत; व त्यांचे गट तयार केले पाहिजेत. असें करतांना ज्यांची वस्ती उठविली जाईल, त्यांच्याकरितां, सरकारी खर्चानें नव्या ठिकाणीं घरें बांधावीं लागतील.

ही सूचना जरी बुद्धीला पटणारी अशी असली तरी ती मूलगामी व धक्का देणारी सूचना आहे. अशा बऱ्याचशा सूचनांप्रमाणें ही सूचना पण कित्येक वर्षें तरी अंमलांत येईल असें दिसत नाहीं. दरम्यानच्या काळांत, शैक्षणिक प्रगति करूं इच्छिणाऱ्या कोणत्याही माणसाला वास्तवतेवर आधारलेल्या अशाच सूचनांचा विचार करावा लागेल. ५०० पेक्षा कमी वस्तीच्या गांवांचा शिक्षणविषयक प्रश्न सोडविण्यासाठीं पुढील तीन गोष्टी कराव्या लागतील. [१] ह्या सर्व गांवांची शैक्षणिकदृष्ट्या पाहणी करून, कोणत्या गांवांना किती शाळा लागतील, त्या कोठें काढल्यानंतर नीट चालू शकतील, हें ठरविलें पाहिजे. [२] अशी पाहणी केल्यानंतर प्रत्येक गांवांतील सोयीच्या ठिकाणीं चार इयत्तांचें शिक्षण देणारी एक 'एक-शिक्षकी' शाळा स्थापन केली पाहिजे. [३] ह्या खेड्यापासून तीन मैलांच्या आंत, एकाद्या ठिकाणीं, एक सात इयत्तांपर्यंतचें शिक्षण देणारी शाळा काढली पाहिजे. [ह्या शाळेंत, मुलांची संख्या कितीही असली तरी शिक्षक दोहोंपेक्षां कमी असतां कामा

नयेत. ] अशा हा त्रिविध कार्यक्रमच जरी तूर्त अंमलांत आणण्याचें ठरविलें तरी हें काम १० वर्षेपर्यंत पुरेल एवढें काम आहे.

(२) शिक्षकांच्या नेमणुका व बदल्या:– दुसरी एक महत्त्वाची बाब म्हणजे ह्या छोट्या ग्रामीण शाळांतील शिक्षकांच्या नेमणुका व बदल्या बहुशिक्षकी शाळांतून करण्यापेक्षां 'एक-शिक्षकी' शाळेमध्यें काम करणें अधिक कठीण आहे, ही गोष्ट तत्वत: सर्वांनीं आज मान्य केलेली आहे. अतएव त्या शाळांमध्यें नेमले जाणारे शिक्षक कर्तबगार, तळमळीचे व ट्रेन्ड असावेत; परंतु व्यवहारांत मात्र परिस्थिति पुष्कळदां अगदीं उलट दिसून येते. 'एक-शिक्षकी' शाळा ह्या बहुधा दूरदूरच्या विरळ वस्तीच्या खेड्यांतून पसरलेल्या असतात. त्या गांवीं जाण्यायेण्याची सोय चांगली नसते. त्या ठिकाणीं खूप अडचणी असतात. बाजाराची सोय नाहीं, टपालाची व्यवस्था नाहीं, दवाखाना नाहीं, साधें चांगलें पाणीसुद्धां प्यायला मिळणें कठीण; अशा ह्या खेड्यांत काम करायला शिक्षक सहसा तयार होत नाहींत. कर्तबगार, तळमळीचे ट्रेन्ड अशा शिक्षकांची संख्या नेहमींच कमी असते. ज्या सात इयत्ता शिकविणाऱ्या मोठ्या शाळा आहेत त्यांना ह्या अशा चांगल्या शिक्षकांची गरज अधिक भासते, त्यामुळें साधारणपणें अन्-ट्रेंड व अननुभवी अशा नवागत शिक्षकाचीच 'एक-शिक्षकी' शाळांवर नेमणूक करण्यांत येते. ह्या खेरीज शिक्षा म्हणून,



एकाद्या हट्टी, अडेलतट्टूला पण ह्या शाळेवर पाठविण्यांत येतें. ही सर्व परिस्थिति लक्षांत घेतां, 'एक-शिक्षकी' शाळांतून होणाऱ्या कामाचा दर्जा, सर्वसाधारणपणें वाईट ठरला तर, त्यांत आश्चर्य बाळगण्यासारखें कांहीं नाहीं.

ह्या सर्व अडचणींतून सुटण्याचा एकच मार्ग आहे. तो म्हणजे शिक्षकांची संख्या जेवढी वाढवितां येईल तेवढी ती वाढविण्याची प्रयत्न करणें. कोणत्याही प्राथमिक शिक्षकाला तो ट्रेन्ड झाल्याशिवाय, कायम करावयाचें नाहीं, हें तत्त्व, सर्व प्रदेश सरकारांनीं मान्य केलें पाहिजे. त्याचप्रमाणें त्यांनीं आपल्या प्रांतांतील ट्रेनिंग कॉलेजांच्या संख्येंत वाढ केली पाहिजे. जरूर तेवढीं ट्रेनिंग कॉलेजें काढल्यावर सरकारनें असें एक धोरण स्वीकारलें पाहिजे कीं, ज्याला शिक्षक म्हणून नेमायचें तो एक तर नेमणुकीपूर्वींच ट्रेनिंग घेतलेला शिक्षक घ्यावयाचा अथवा त्याला त्याची नेमणूक झाल्यापासून ३ ते ४ वर्षांच्या आंत ट्रेनिंगला पाठवायचें. ही सुधारणा जर घडवून आणली व जर शिक्षकांची निवड अधिक काळजीपूर्वक केली, तर सर्व 'एक-शिक्षकी' शाळा, ट्रेन्ड कर्तबगार शिक्षकांकडे देणें शक्य होईल; परंतु ही गोष्ट करणें सोपें नाहीं. हें करण्यासाठीं शिक्षकांची भरती करण्याची आपली आजची जी पद्धति आहे ती आमूलाग्र बदलावी लागेल; लोकल बोर्डाला देण्यांत आलेल्या सत्तेला थोडी मर्यादा घालावी लागेल. हें होईपर्यंत ज्यांच्याकडे आज शाळांचा कारभार

चालविण्याचें काम आहे, त्यानें आहे त्या परिस्थितींतच, त्यांना जितके करतां येतील तितके प्रयत्न करून ह्या 'एक-शिक्षकी' शाळांना ट्रेन्ड शिक्षक द्यावेत. ट्रेन्ड शिक्षक मिळूं शकले नाहींत तर, चांगलें निष्ठावंत शिक्षकच ह्या शाळेंत पाठविण्यांत यावेत. कांहीं कारणामुळें हें जर करतां येणें अशक्य झालें तर होणारी गैरसोय दूर करण्यासाठीं 'एक-शिक्षकी' शाळांच्या शिक्षकांसाठीं अभ्यासवर्ग ( रिफ्रेशर कोर्स ) चालविण्यांत यावेत किंवा ह्या शाळांत काम करणाऱ्या शिक्षकांवर अधिक देखरेख ठेवण्यांत यावी. त्यांना अधिक मार्गदर्शन करण्याची व्यवस्था व्हावी.

ह्या बाबतींत दोन उपयुक्त सूचना करतां येण्यासारख्या आहेत. त्यांपैकीं पहिली सूचना रेल्वेच्या नोकरांसाठीं रूढ असलेल्या एका नियमाला धरून आहे. रेल्वेचीं कांहीं कांहीं स्टेशनें, अगदीं खराब हवेच्या ठिकाणीं आहेत. साहजिकच, अशा स्टेशनांत काम करायला जाण्यास, रेल्वेचे स्टेशन मास्तर अगदीं नाखूष असतात. ह्यामुळें रेल्वे कंपनीनें असा नियम केला आहे कीं, प्रत्येक स्टेशन मास्तरनें, ह्या वाईट हवेच्या ठिकाणीं, कांहीं ठराविक मुदतीपर्यंत [ बहुधा दोन वर्षेपर्यंत ] काम केलेंच पाहिजे. एकत्र कुटुंबांत, एकादी अटळ अडचण उत्पन्न झाली तर ज्याप्रमाणें, कुटुंबांतील सर्व मंडळी अडचण झेलण्यास पुढें येतात व त्या अडचणींतून मार्ग काढतात, त्याप्रमाणें रेल्वेच्या



लोकांनीं वर सांगितलेला नियम करून, आलेल्या अडचणीला तोंड दिलें आहे. ह्याचप्रमाणें आपणांलांही असा नियम करतां येणें शक्य आहे कीं, प्रत्येक ट्रेन्ड शिक्षकाला 'एक-शिक्षकी' शाळेवर तीन ते पांच वर्षेपर्यंत काम केलेंच पाहिजे. ह्यामुळें 'एक-शिक्षकी' शाळेवर बदली झाल्यामुळें शिक्षकांची आज जी धुसफूस चालते ती बंद पडेल. त्याचप्रमाणें आज कांहीं नाखूष ट्रेन्ड शिक्षकांना 'एक-शिक्षकी' शाळेंत डांबून ठेवण्याची जी पाळी येते, त्यांतून पण आपली सुटका होईल. ही एक हंगामी स्वरूपाची सूचना आहे, पण आज आपलें ट्रेन्ड शिक्षकांचें प्रमाण जवळजवळ निम्में आहे. अशा वेळीं ही सूचना उपयुक्त ठरेल. दुसरी गोष्ट म्हणजे शिक्षकाला शिक्षा करण्यासाठीं बदलीच्या हत्याराचा वापर करण्यांत येऊं नये. जो हट्टी, अडेलतट्टू शिक्षक आहे, त्याच्यावर अधिक देखरेख ठेवण्याची गरज आहे. अशा शिक्षकाला एकाद्या बहुशिक्षकी शाळेंत उपशिक्षक म्हणून नेमावें. ह्या ठिकाणीं त्याचा उपद्रव कमी होईल. परंतु त्याला जर 'एक-शिक्षकी' शाळेंत बदललें तर तो त्या शाळेचें नुकसान करील, कारण त्याठिकाणीं तोच सर्वसत्ताधीश असतो. ह्या शिक्षकाच्या अपराधाबद्दल त्याला वाटेल ती दुसरी शिक्षा द्यावी. त्याला ताकीद द्यावी, दंड करावा, पगारांत कपात करावी; वाटल्यास त्याला नोकरीवरून काढूनसुद्धां टाकावें; परंतु एका दूरच्या गांवीं असलेल्या 'एक-शिक्षकी' शाळेंत

शिक्षा म्हणून, त्याची बदली केव्हांही करण्यांत येऊं नये.

( ३ ) शिक्षकांच्या रजा—'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाला रजा देण्याचा प्रश्न खूपच कठीण होऊन बसतो. बहुशिक्षकी शाळेंतील, एक दोन शिक्षक जर रजेवर गेले तर त्यांचें काम, हजर असणाऱ्या शिक्षकांत वाटलें जातें. त्यामुळें शाळा बंद करण्याची पाळी कधीं येत नाहीं. ह्या उलट प्रकार 'एक-शिक्षकी' शाळेंत आढळतो. एथील शिक्षक रजेवर गेल्यास, शाळेचें काम पूर्ण बंद पडतें. ह्या शाळेंतील शिक्षकांना रजा देणें व त्यांच्या रजेच्या मुदतींत दुसऱ्या शिक्षकांची नेमणूक करणें, ह्या बाबत एकादी सविस्तर योजना आंखणें आज जरुरीचें झालें आहे.

ह्यासाठीं प्रचलित असलेल्या पद्धतींची पाहणी केली तर असें दिसून येईल कीं, ह्या 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाला लागणारी किरकोळ रजा, त्या गांवांतील स्थानिक शाळा समितीचे अध्यक्ष मंजूर करतात. त्याला लागणारी इतर प्रकारची रजा, एकादा वरिष्ठ अधिकारी (स्कूल बोर्डाचे ॲड्मिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर) अथवा त्याला नेमणारी एकादी समिति मंजूर करते. ह्या अधिकाऱ्याला अथवा समितीला गैरहजर शिक्षकांच्या मुदतींत दुसरा शिक्षक पाठविण्याचा अधिकार असतो. व्यवहारांत मात्र ही योजना, नेहमींच व्यवस्थित चाललेली दिसत नाहीं. कांहीं कांहीं ठिकाणीं ही शाळा समिति नसते व ती असली तरी बहुधा



नामधारीच असते. अशा वेळीं सर्व कायदा शिक्षकाच्याच हातांत असतो. आपल्या कर्तव्याची विशेष चाड न बाळगणारे शिक्षक रजा मिळविण्यासाठीं नेहमीं एका विशिष्ट पद्धतीनें वागतांना दिसतात. ज्यावेळीं त्यांना रजेवर जायचें असतें त्यावेळीं, "कांहीं आकस्मिक वा अनपेक्षित कारणामुळें मला रजेवर जाणें भाग पडत आहे," अशा अर्थाची एक चिठ्ठी लिहून, ती शाळेंत ठेऊन ते निघून जातात. त्यांच्या गैरहजेरींत एकादा अधिकारी उपस्थित झालाच, तर त्याला ती चिठ्ठी दाखविण्यांत येते. त्या शिक्षकाच्या सुदैवानें, जर ह्या मुदतींत, शाळेंत कोणीच आलें नाहीं; तर परत आल्यावर ती चिठ्ठी फाडून टाकून खोटी हजेरी भरण्यांत येते व शिक्षक रजेवर नव्हतेच असें भासविण्यांत येतें.

ह्या गोष्टीला पायबंद घालण्यासाठीं एकादी कार्यक्षम शाळा समिति प्रत्येक ठिकाणीं स्थापन केली पाहिजे; निदान त्या समितीसाठीं कार्यक्षम असा चेअरमन तरी निवडला पाहिजे. हें नेहमींच शक्य होणार नाहीं. आणि समजा हें शक्य झालें तर त्यानें काय फायदा होणार ? शिक्षकाच्या गैरहजेरीला कायद्याचा पाठींबा मिळेल. शिक्षकांवर नियंत्रण ठेवणाऱ्या व्यक्तीला किंवा संस्थेला शिक्षक किरकोळ रजेवर असतांना त्याच्या गैरहजेरीच्या मुदतीत बदली नेमतां येणें शक्य होणार नाहीं. बदली शिक्षक नेमला नाहीं तर शाळा

बंद राहणारच. मागें सांगितलेला, वर्गनायक नेमण्याच्या पद्धतीचा जर स्वीकार केला गेला तर त्यामुळें थोडा फायदा होऊं शकेल. अल्पकाळ वर्गनायकाला शिक्षकाच्या गैरहजेरींत शाळा चालू ठेवतां येणें शक्य होईल. शाळा साफ बंद ठेवण्यापेक्षां, ती वर्गनायकामार्फत चालू ठेवणें सोयीचें होईल. परंतु ही वर्गनायक नेमण्याची पद्धति आपण बंद केली आहे व ती पुन्हा चालू होण्याचें चिन्ह कांहीं दिसत नाहीं. ह्या विशिष्ट आपत्तींतून मार्ग काढण्यासाठीं वर्गनायकाची मदत घेण्यांवाचून दुसरी कोणतीही युक्ति सांपडत नाहीं.

ह्यापेक्षां मोठी अडचण ज्यावेळीं तांतडीची सूचना देऊन शिक्षक, दीर्घ मुदतीच्या रजेवर जायला निघतो, त्यावेळीं उत्पन्न होते. ज्या शिक्षकांना अशी दीर्घ मुदतीची रजा घ्यावयाची असते, त्यांनीं खूप आधीं तसें वरिष्ठांना कळविलें पाहिजे, अशी त्यांना ताकीद दिलेली असते हें खरें आहे; परंतु नेहमींच तशी सूचना देण्यांत येत नाहीं. कधीं कधीं तें शक्य होत नाहीं. ज्यावेळीं अशा रीतीनें एकाद्या शिक्षकाला तांतडीनें रजेवर जावें लागतें. त्यावेळीं त्याच्या बदली दुसरा शिक्षक नेमण्यांत खूप वेळ जातो. त्याचें कारण म्हणजे नेमणूक करणाऱ्या अधिकाऱ्याला, एका ठराविक चाकोरींतून जावें लागतें. शिक्षकांच्या रजेची हकीगत मुख्य कचेरीपर्यंत जाऊन पोहोंचायला कांहीं तरी वेळ हा लागतोच. त्यानंतर ह्या कचेरीचीं सूत्रें हालायला लागतात. नेमणूक करण्यास



लायक अशा शिक्षकांची जी यादी मुख्य कचेरींत तयार असते, त्या यादींतील एकाद्या गृहस्थाची नेमणूक करून त्याला, तसा हुकूम पाठविण्यांत येतो. ह्या माणसाला तो हुकूम पोहोंचून तो जाऊन त्या नेमणुकीच्या ठिकाणीं हजर होण्यास आणखी कांहीं वेळ लागतो. कधीं कधीं हा नवा उमेदवार जाण्याचें नाकारतो. नंतर दुसरा मनुष्य शोधून त्याला हुकूम पाठवावा लागतो; शेवटीं कोणीतरी त्या जागेवर केव्हांतरी, जाऊन पोहोंचतो. ह्या सर्व रहाटगाडग्यांतून जातांना असें आढळून येतें कीं, नव्या शिक्षकाची नेमणूक होऊन तो जागेवर जाऊन पोहोंचेपर्यंत रजेवर गेलेल्या शिक्षकाची रजा पूर्ण होऊन तो आपल्या कामावर हजर होतो. ह्या सर्व काळांत ती शाळा मात्र शिक्षकावांचून राहिल्यामुळें; शिक्षकाच्या रजेच्या मुदतींत, बंद राहते.

वर सांगितलेली परिस्थिति कपोलकल्पित नाहीं. मुंबई प्रांतांतील ६ जिल्ह्यांची ह्या बाबतींत एक चांचणीवजा, पाहणी करण्यांत आली. त्यावेळीं असें आढळून आलें कीं, 'एक-शिक्षकी' शाळांपैकीं शेंकडा १० शाळा ह्या केव्हां ना केव्हां तरी बंद होत्या; कारण त्याठिकाणचा शिक्षक रजेवर गेला व रजेच्या मुदतींत वेळेवर दुसऱ्या कोणाची नेमणूक होऊं शकली नाहीं; अथवा रजेची मुदत ३० दिवसांपेक्षां कमी असतांना ह्या मुदतींत बदली नेमला नाहीं (किंवा बदली नेमणें शक्य झालें नाहीं) किंवा रजेची मुदत ३०

दिवसांपेक्षां जास्त असली तरी वर सांगितलेल्या कारणांमुळे त्या ठिकाणीं बदली शिक्षक जाऊं शकत नाहीं. ह्या सर्व कारणांमुळे कित्येक 'एक-शिक्षकी' शाळा, एक महिन्यां-पेक्षां जास्त काळ बंद राहिल्या. ह्या सर्व परिस्थितीची आपण नीट दखल घेतली पाहिजे व ही परिस्थिति बदलण्याचा पण प्रयत्न केला पाहिजे.

मुंबई प्रांतांची ह्या दृष्टीनें काळजीपूर्वक पाहणी करण्यांत आल्यावर ह्या बाबतींत पुढील सूचना करण्यांत आली:— एका जिल्ह्यांतील 'एक-शिक्षकी' शाळांचे १८ ते २५भाग पाडावयाचे. ह्या शाळांवर देखरेख ठेवण्याचें काम एका मध्य-वर्ति शाळेकडे सोंपवायचें. ह्या शाळेंत एक जादा शिक्षक नेमून त्यांच्याकडे दुसऱ्या शिक्षकाच्या रजेच्या मुदतींत बदली शिक्षकाचें काम यायचें. ज्यावेळीं 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाला ७ दिवसांपेक्षां जास्त मुदतीच्या रजेवर जावयाचें असेल, त्यावेळीं त्यानें ह्या मध्यवर्ति शाळेच्या मुख्य शिक्ष-काला त्याप्रमाणें कळवायचें. ह्या मुख्य शिक्षकानें तावडतोब त्या बदली शिक्षकाला, त्या 'एक-शिक्षकी' शाळेंत पाठ-वायचें व नंतर खात्याच्या मंजुरीकरितां सर्व कागदपत्र मुख्य कचेरीकडे रवाना करायचे. ह्या योजनेप्रमाणें शिक्षकाच्या रजेमुळें 'एक-शिक्षकी' शाळा बंद राहण्याचे प्रसंग फार कमी येतील व एका शिक्षकाच्या रजेच्या मुदतींत दुसरा शिक्षक तावडतोब पाठविणें शक्य होईल. ह्या योजनेमुळें



एकच अडचणीची बाब उत्पन्न होते. एकूण शिक्षकांच्या संख्येपेक्षां शेंकडा पांच टक्के शिक्षक, ह्या योजनेमुळें जास्त लागतात. ही बाब लक्षांत घेतली तर प्रदेश सरकारच्या आजच्या विशिष्ट आर्थिक परिस्थितींत त्यांना ही योजना स्वीकारतां येईल असें वाटत नाहीं.

मुंबई राज्यांतील एक सेवानिवृत्त शिक्षणाधिकारी, श्री. एस्. आर. तावडे, ह्यांनीं ह्या बाबतींत, जादा खर्च न येईल अशी एक अभिनव योजना आंखली. ५–६ मैलांच्या परिसरांतील सर्व शाळा त्यांनीं एका निवडक अशा मुख्य शिक्षकाच्या हाताखालीं ठेवल्या. ज्यावेळीं ह्या गटांतील एकाद्या 'एक-शिक्षकी' शाळेच्या शिक्षकाला रजेवर जाव-याचें असे, तेव्हां त्यांनीं ह्या मुख्य शिक्षकाची परवानगी मागायची. ह्या शिक्षकाला ही परवानगी देतां येणें सहज शक्य होत असे, कारण तो त्या 'एक-शिक्षकी' शाळेपासून फार दूर राहत नसे. ह्या रजेची मुदत जर ७ दिवसांपेक्षां अधिक असली तर ह्या मुख्य शिक्षकानें आपल्या एका उप-शिक्षकाला, त्या 'एक-शिक्षकी' शाळेंत काम करायला पाठवायचें. ह्यामुळें मध्यवर्ति शाळेंत त्या काळांत एक शिक्षक कमी होत असे. परंतु मध्यवर्ती शाळा ही बहुशिक्षकी शाळा असल्यामुळें त्याठिकाणीं ह्या एका शिक्षकाचें काम, इतरां-मध्यें विभागून देणें शक्य होत असे. ज्यावेळीं ह्या गैरहजर शिक्षकाऐवजीं, मुख्य कचेरींतून बदली शिक्षकांची नेमणूक

होऊन तो जाऊन 'एक-शिक्षकी' शाळेंत हजर होई त्यावेळीं हा मध्यवर्ति शाळेंतून गेलेला शिक्षक आपल्या जागीं परत येई. ह्या योजनेमध्यें वर सांगितलेल्या योजनेमुळें येणारा जादा खर्च वाचूं शकतो व 'एक-शिक्षकी' शाळेंत होणारी अडचण त्या शेजारच्या बहुशिक्षकी शाळेकडे पाठवून 'एक-शिक्षकी' शाळेचें काम सुरळीत चालूं ठेवतां येतें. बहुशिक्षकी शाळा मोठी असल्यामुळें थोडीशी अडचण सोसणें तिला शक्य होतें. ह्या योजनेमुळें, एकाद्या कार्यक्षम शाळा-समितीच्या अभावीं सुद्धां 'एक-शिक्षकी' शाळांतील शिक्षकांवर योग्य देखरेख ठेवणें शक्य होतें. ह्या प्रयोगाला यश मिळण्याची शक्यता खूपच आहे, अतएव त्याला मान्यता देऊन त्याचा प्रचार करणें जरूर आहे.

(४) **शिक्षकांसाठीं अभ्यासवर्ग (ट्रेनिंग)**—ह्या विषयाला धरून दुसऱ्या एका प्रश्नाची चर्चा करणें जरूर आहे. 'एक-शिक्षकी' शाळेंत काम करणाऱ्या शिक्षकांना कांहीं विशिष्ट प्रकारचें ट्रेनिंग देणें जरुरीचें आहे काय? दुर्दैवानें भारतांत ह्या प्रश्नाकडे फारसें कोणीं लक्ष दिलेलें आढळत नाहीं. प्राथमिक शिक्षकांसाठीं काढलेली आपलीं बहुसंख्य ट्रेनिंग कॉलेजें शहरांतच आहेत. ह्यामुळें ट्रेनिंग कॉलेजांतील विद्यार्थ्यांना एकादी आदर्श 'एक-शिक्षकी' शाळा पाहायला मिळत नाहीं अथवा त्या शाळेंत जाऊन पाठ घेण्याची संधि मिळत नाहीं. आज ह्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांना



वेगवेगळे असे कांहीं पाठ अभ्यासासाठीं घ्यावे लागतात. ही व्यवस्था बहुशिक्षकी शाळांतील शिक्षकांच्या सोयीची असते. त्यांना एका इयत्तेवर सर्व विषय शिकवावे लागतात. किंवा कांहीं इयत्तांवर एकच विषय शिकवावा लागतो; परंतु हें अध्यापन 'एक-शिक्षकी' शाळेंतील विद्यार्थ्याला फारसें उपयुक्त असें मार्गदर्शन करूं शकत नाहीं. 'एक-शिक्षकी' शाळांमध्यें रूढ असलेल्या ज्या कांहीं विशिष्ट शिक्षणपद्धति आहेत त्यांचा बऱ्याचशा प्रांताच्या ट्रेनिंग कॉलेजांतील अभ्यासक्रमांत समावेश केलेला आढळत नाहीं; इतकेंच नव्हे तर ह्या विषयाकडे जवळ जवळ दुर्लक्षच झालेलें असतें. कांहीं ट्रेनिंग कॉलेजांत ह्या विषयाला अभ्यासक्रमांत स्थान दिलेले आढळतें, परंतु प्रत्यक्ष शिकवितांना ह्या विषयासंबंधीं अवास्तव, सिद्धांतवजा असे ठोकळेबाज विवेचन केलें जातें. ह्यामुळें "आमच्या ट्रेनिंग कॉलेजांतून बाहेर पडणाऱ्या सर्वसाधारण शिक्षकाला 'एक-शिक्षकी' शाळा चालविण्याच्या विशिष्ट पद्धतींची माहिती नसतें किंवा त्या पद्धति प्रत्यक्षांत अंमलांत आणण्याचें सामर्थ्य त्याच्याजवळ नसतें," असें विधान जर कोणी केलें तर तें फारसें अतिशयोक्तिपूर्ण होईल असें वाटत नाहीं. तांतडीनें लक्ष द्यायला पाहिजे इतका महत्त्वाचा हा प्रश्न आहे.

ग्रामीण विकासांतील छोट्या शाळांच्या शिक्षकांना विशेष प्रकारच्या ट्रेनिंगची आवश्यकता आहे. ही गोष्ट आज वादा-

तीत आहे. हें ट्रेनिंग कोणत्या पद्धतीनें द्यावें, त्याच्या तपशीलाबाबत वाद होऊं शकेल. हें ट्रेनिंग दोन प्रकारें देतां येणें शक्य आहे. (१) नोकरीवर लागण्यापूर्वीं द्यावयाचें ट्रेनिंग आमच्या शाळांपैकीं जवळ जवळ ५० टक्के शाळा ह्या 'एक-शिक्षकी' शाळाच आहेत त्यामुळें आपले निम्मे किंवा त्याहून अधिक शिक्षक हे कांहीं काळ तरी 'एक-शिक्षकी' शाळेंतच काम करणार. ह्यामुळें प्राथमिक शाळांच्या ट्रेनिंग कॉलेजाच्या अभ्यासक्रमांत 'एक-शिक्षकी' शाळा चालविण्याची विशिष्ट पद्धति व तंत्र, ह्यांना निश्चित असें स्थान दिलें पाहिजे. नव्हे एकूण सर्व अभ्यासक्रमाचाच तो एक अविभाज्य असा घटक बनला पाहिजे. ट्रेनिंग असणाऱ्या प्रत्येक शिक्षकाला एक आठवडाभर सतत 'एक-शिक्षकी' शाळेंत जाऊन तेथें शिकविण्याची संवय होण्यासाठीं पाठ घ्यायला लावले पाहिजेत. शक्यतों हीं ट्रेनिंग कॉलेजें ग्रामीण विभागांत नेलीं पाहिजेत व त्यांच्या विद्यार्थ्यांना अध्यापनाची संवय लावण्याकरितां त्यांच्यासाठीं कांहीं 'एक-शिक्षकी' शाळा तेथें चालविल्या पाहिजेत. ट्रेनिंग कॉलेजें जर शहरांत असलीं तर तेथेंसुद्धां त्या कॉलेजला सोडून कांहीं खास 'एक-शिक्षकी' शाळा काढल्या पाहिजेत.

एवढें केल्यानें आपले सर्व प्रश्न सुटणार नाहींत. शाळांचा दैनंदिन कारभार चालवितांना असे कांहीं प्रसंग येणारच कीं ज्यामुळें, ट्रेनिंग कॉलेजांत कधींही न गेलेल्या शिक्षकांना



आपणांला 'एक-शिक्षकी' शाळांवर पाठवावें लागेल. तसेंच पूर्वीं जे ट्रेन्ड् झाले आहेत परंतु ज्यांना 'एक-शिक्षकी' शाळा चालविण्याचें खास शिक्षण मिळालें नाहीं त्यांनासुद्धां 'एक-शिक्षकी' शाळांवर जावें लागेल. अशा शिक्षकांसाठीं दरसाल, शाळा सुरू होण्यापूर्वीं अभ्यासवर्ग चालवावा लागेल. ह्या वर्गाची मुदत १५ दिवसांची असावी. पहिले पांच दिवस व्याख्यानासाठीं व सर्वसाधारण चर्चेसाठीं राखून ठेवावेत. पुढील ७ दिवस प्रत्येक शिक्षकाला कोणत्या तरी जाणत्या माणसाच्या देखरेखीखालीं 'एक-शिक्षकी' शाळेंत शिकवायला लावावें. शेवटचे तीन दिवस पुन्हा सर्वांनीं एकत्र जमून चर्चा करावी, विचारविनिमय करावा व एकंदर कामाचा समारोप करावा. ज्या शिक्षकांना 'एक-शिक्षकी' शाळेंत प्रथमतःच नेमण्यांत आलें असेल, त्या सर्वांना, ह्या अभ्यासवर्गाला, सक्तीनें पाठवावें. जे ट्रेन्ड झालेले आहेत त्यांना एकदां अशा वर्गाला पाठविलें कीं काम होईल, परंतु अन्ट्रेन्ड् शिक्षकांना दोनतीन वर्षें सतत पाठवावें लागेल. अशा प्रकारचे अभ्यासवर्ग घडवून आणणें फारसें खर्चाचें होणार नाहीं व 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकांचा मगदूर सुधारण्यासाठीं त्यांची जी मदत होईल ती कितीतरी मोलाची ठरेल.

**(५) शाळेंत दाखल होणाऱ्या नव्या विद्यार्थ्यांसाठीं कांहीं निर्बंधः**—शाळेंतील सर्वांत खालच्या वर्गांत येणाऱ्या विद्यार्थ्यांना वर्षाच्या प्रारंभीं पहिल्या एक दोन महिन्यांतच

घेण्यांत यावें असें केलें म्हणजे आपला वर्ग चांगला एक-जिनसी बनेल व वर्गाची प्रगति पण चांगली होईल. हा नियम प्राथमिक शाळांच्या खूप सोयीचा आहे; परंतु ह्या नियमाची अंमलबजावणी मोठमोठ्या गांवांतून सुद्धां आज होऊं शकत नाहीं. ह्यामुळें शाळेंतील शेवटच्या वर्गांत, निरनिराळे छोटे छोटे वर्ग निर्माण होतात. मुलांच्या प्रगतिप्रमाणें हे वर्ग चालवावे लागतात व त्यामुळें शिक्षकाचें काम खूपच बिकट होतें, म्हणून ' एक-शिक्षकी ' शाळेंत तरी, ह्या नियमाची काटेकोरपणें अंमलबजावणी केली गेली पाहिजे.

( ६ ) शाळांची देखरेख—' एक-शिक्षकी ' शाळांवर देखरेख करण्याचा प्रश्न पण बिकट झाला आहे. ह्या बाबतींत पहिली ध्यानांत ठेवण्याची गोष्ट ही कीं, ह्या शाळांवर सारखी व भरपूर देखरेख पाहिजे. सध्यां एका तपासणी अधिकाऱ्यांना जवळजवळ ६० शाळा सांभाळाव्या लागतात. ( कधीं कधीं ही संख्या जास्त पण असूं शकते. ) त्यामुळें ह्या अधिकाऱ्यांना प्रत्येक शाळेंत वर्षांतून फक्त दोनदां जातां येतें. एकदा भेट देण्यासाठीं व एकदां तपासणीसाठीं. एवढी देखरेख पुरेशी आहे, असें म्हणतां येणार नाहीं. त्यांतून तेथील शिक्षक जर अन्ट्रेन्ड असले तर ही देखरेख अपुरीच आहे असें म्हणावें लागेल. ह्यासाठीं उत्तम मार्ग म्हणजे केंद्र-शाळांची स्थापना करणें व ह्या मध्यवर्ति शाळेच्या मुख्य शिक्षकाला भोंवतालच्या सर्व 'एक-शिक्षकी' शाळांवर देखरेख



करण्याचा आधिकार देणें. ह्या मुख्य शिक्षकाला आजूबाजूच्या प्रत्येक ' एक-शिक्षकी ' शाळेला तीन महिन्यांतून एकदां तरी भेट देतां येईल व तेथील शिक्षकाला आपल्या केंद्र-शाळेंत, आदर्शपाठ पाहण्यासाठीं व चर्चेसाठीं मधून मधून बोलावतां येईल. ह्यायोगें ह्या ' एक-शिक्षकी' शाळावर वरचेवर अधिक चांगली देखरेख, होऊं शकेल. ह्या पद्धतीनें देखरेख करण्याचा खर्च पण कमी होईल. ह्या मुख्य शिक्षकाला द्यावा लागणारा भत्ता एका तपासणी अधिकाऱ्यांना द्यावा लागणाऱ्या पगारापेक्षां व भत्त्यापेक्षां खूपच कमी होईल. ह्यासाठीं ' एक-शिक्षकी ' शाळांचा कारभार सुव्यवस्थितपणें चालविण्यासाठीं केंद्र-शाळांची योजना अंमलांत आणणें अत्यंत जरुरीचें आहे.

---

## : ५ :

## शैक्षणिक प्रश्न

मागील प्रकरणांत ह्या शाळासंबंधींच्या कांहीं कारभार-विषयक प्रश्नांचा आपण विचार केला. तसेंच हे प्रश्न सोडविण्याबाबत मार्गदर्शनसुद्धां केलें. ह्या प्रकरणांतून ह्या शाळांविषयक इतर प्रश्नांचा आपण विचार करूं. हे प्रश्न पूर्णतः शैक्षणिक स्वरूपाचे आहेत. ह्या प्रश्नांचे साधारणपणें दोन भाग पडतात. (१) इयत्तावर मुलांची विभागणी. (२) अभ्यासक्रमाची विषयवार विभागणी.

(१) एकाकी 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाला, एकावेळीं, ४-५ इयत्ता सांभाळाव्या लागतात. त्याचप्रमाणें त्याला ८ ते ९ विषय पण शिकवावे लागतात. हें काम निःसंशय कठीण आहे. परंतु आपल्या देशांत ज्यावेळीं द्विदल राज्यपद्धति होती, त्यावेळचे राज्यकर्ते म्हणत, त्याप्रमाणें हें काम अशक्य मात्र नाहीं. परदेशांतील ग्रामीण विभागांत काम करणाऱ्या 'एक-शिक्षकी' शाळांना तर ह्याहून कठीण कामें करावीं लागतात. तेथील शिक्षकांना ७ ते ८ इयत्ता शिकवाव्या लागतात व त्यांचा अभ्यासक्रम आमच्या येथील अभ्यासक्रमापेक्षां जास्त व्यापक स्वरूपाचा



असतो. जर तेथील शिक्षकांना आपली जबाबदारी व्यवस्थितपणें पार पाडतां येतें; तर आपल्या एथील शिक्षकांना ४-५ इयत्ता व त्यांच्यापेक्षां कमी विषयांचा अभ्यासक्रम शिकविणें सहजच शक्य होईल. आज मुख्यतः एका गोष्टीची आपणांस खास जरुरी आहे. परदेशांनीं ह्या बाबतींत मिळविलेल्या अनुभव जमेला धरून ह्या प्रश्नाकडे पाहण्याचा दृष्टिकोन आपण तयार केला पाहिजे.

**इयत्तांचें एकीकरण**—ह्या 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकांचा भार कमी करण्यासाठीं भिन्न भिन्न सूचना केल्या जातात. त्यांपैकीं एक महत्त्वाची सूचना म्हणजे, त्याला शिकवाव्या लागणाऱ्या इयत्तांची संख्या कमी करणें. ह्या बाबतींत अमेरिकेनें इयत्तांचें एकीकरण करण्याचा जो प्रयत्न केला तो विचारार्ह आहे. ज्या ठिकाणीं एका शिक्षकाला ५ इयत्ता शिकवाव्या लागतात, त्याठिकाणीं १ ली इयत्ता स्वतंत्र ठेवावी, दुसरी व तिसरी एक करावी; तशीच ४ थी व ५ वी पण एक करावी. अशाप्रकारें एका शिक्षकाला सांभाळाव्या लागणाऱ्या वर्गांची संख्या ५ वरून ३ वर आणतां येईल. जेथें एका शिक्षकाला ४ च इयत्ता शिकवाव्या लागतात तेथें १ ली व २ री एक करावी; व ३ री व ४ थी एक करावी असें केलें तर शिक्षकाला फक्त २ च वर्ग सांभाळावे लागतील. नवे विद्यार्थी दरसाल दाखल करावेत अथवा त्यांना एक वर्षाआड दाखल करून घ्यावें.

वर सांगितल्याप्रमाणें योजना आंखण्यांत सोय आहे, हें स्पष्ट करण्याकरितां किती जरी गोष्टी पुढें मांडण्यांत आल्या, तरी कित्येक शिक्षक, पालक व तपासणी अधिकारी ग्रामीण शिक्षणाची एक पद्धति म्हणून वरील योजनेचा स्वीकार करायला तयार नाहींत. ह्यामध्यें विशेष आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. आमच्या शिक्षणक्षेत्रांत काम करणारे बहुसंख्य लोक नागरी जीवनांत वाढलेले आहेत. त्यांच्या संवयी व दृष्टिकोन पूर्णपणें नागरीच आहे. त्यांच्या मतें ग्रामसुधारणा म्हणजे खेडेगांवांना छोट्या शहरांचें स्वरूप देणें. त्यांना वाटतें कीं, शहरामध्यें ज्याप्रमाणें मुलांची निरनिराळ्या इयत्तांमधून विभागणी केली जाते, तशी विभागणी खेड्यांतील शाळांतून पण व्हावी. त्यांचा असा प्रामाणिक समज असतो कीं, जें शहराला मानवलें तेंच खेड्यांना मानवेल व म्हणून ते शहरांतील सर्व गोष्टींची सही-नक्कल खेड्यांसाठीं करतात. अतएव वर उल्लेखिलेल्या योजनेचा संपूर्णपणें विचार करणें जरूर आहे.

ह्या विषयावर मागें अमेरिकेंत जी एक चर्चा चालू होती, तिचा उल्लेख करणें उद्‌बोधक ठरेल. आपण लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, अमेरिकेसारख्या पुरोगामी देशांतसुद्धां, हे इयत्तांचें एकीकरण करणें, अथवा कांहीं इयत्ता, एक वर्षाआड चालविणें तेथील लोकांना पसंत नव्हतें. ह्याबाबतींत पुढील दोन मुद्यांवर लोकांचा विरोध आधारलेला असे--



( १ ) ह्या योजनेमुळें शाळेच्या दैनंदिन कारभारांत अडथळे उत्पन्न होण्याचा संभव असतो. ह्या शाळेंतील मुलांना दुसऱ्या शाळेंत जावयाचें झालें तर काय होईल ? तसेंच ह्या शाळेंतील मुलांना वरच्या वर्गात घालतांना कांहीं अडचणी उत्पन्न होतील का ? अशा प्रकारचे प्रश्न विचारून लोक ह्या योजनेला विरोध करतात. ह्या अशा शाळेच्या विद्यार्थ्यांना शालेय वर्ष पूर्ण होण्याच्या आंत ज्या शाळेंत नेहमींच्या पद्धतीनें इयत्तांचें काम चालू असतें अशा ग्रामीण विभागांतील अथवा नागरी विभागांतील शाळेंत जाण्याचा प्रसंग आला तर कितीतरी अडचणी निर्माण होतील; ही बाब खरोखरीच विचार करण्यासारखी आहे. ही अडचण केव्हां तापदायक होईल ? ज्या वेळीं फार मोठ्या प्रमाणांत अशा शाळेंतील मुलें नागरी विभागांत जावयास निघतील तेव्हां. ह्या बाबतींत फार काळजीपूर्वक पाहणी केली असतां असें आढळून आलें कीं, ह्या योजनेचे विरोधक ह्या अडचणींचा जेवढा बाऊ करतात तेवढी ती त्रासदायक होत नाहीं. न्यूयॉर्क येथील ग्रामीण विभागाच्या एक शाळातपासणी अधिकारी कु. हेल् ह्यांच्या निर्देशनास असें आलें कीं, ग्रामीण विभागांतील विद्यार्थी जेव्हां शाळा बदलतात तेव्हां ते बहुधा पूर्वीच्या आपल्या शाळेसारख्याच एखाद्या शाळेंत जातात. तेव्हां त्यांच्या मतें हा प्रश्न स्थानिक स्वरूपाचा मानून स्थानिक परिस्थिति लक्षांत घेऊनच तो सोडविला जावा. ह्या ज्या अडचणी वर सांगितल्या गेल्या

त्यांचें स्वरूप विशेष तीव्र नसल्यामुळें पुष्कळशा शाळा, ह्या अडचणी आपआपल्या मगदुराप्रमाणें त्या सोडवीत असतात व शालेय वर्ष चालू असतांनाच ग्रामीण विभागांतून शाळा बदलण्यासाठीं आलेल्या विद्यार्थ्यांची चांचणी घेऊन त्याला त्याच्या प्रगतीप्रमाणें दाखल करून घेण्यांत येतें.

ह्या इयत्तांच्या पद्धतींत फेरबदल करण्याच्या प्रश्नाला कांहीं पुराणमतवादी लोकांचा कट्टर विरोध आहे. शाळांतील इयत्तांना धक्का देणें, म्हणजे एकादा निसर्गाचा नियम धाब्यावर बसविणें किंवा एकाद्या धार्मिक सिद्धांताला हरताळ फांसण्यासारखें महाभयंकर कृत्य आहे असें त्यांना वाटतें. एकाद्या मुलानें एका वर्षांत ५ वी व ८ वी इयत्ता करणें व दुसऱ्या वर्षी ७ वी इयत्ता करणें म्हणजे शिक्षणाची थट्टा करण्यासारखें त्यांना वाटतें. असें केल्यास मुलांची बौद्धिक वाढ खुंटेल, असें त्यांचें मत आहे.

ह्या बाबतींत फॅनी डन् नांवाच्या गृहस्थाचें मत असें आहे कीं, शाळांमध्यें अभ्यासक्रम शिकविण्याची जी इयत्तावार पद्धति आहे, तीच एक चांगली पद्धति आहे असें नाहीं. इतिहास शिकवितांना, अथवा गणित शिकवितांना, विषयाची विभागणी वेगवेगळ्या पद्धतीनें करतां येणें शक्य आहे.

वर निर्दिष्ट केलेल्या विरोधी मुद्यांना, शैक्षणिक बैठक नसल्यामुळें, विरोधाचे बार फुसकें ठरलें. हळू हळू लोकांना पटूं लागलें कीं, एका विशिष्ट परिस्थितींत शाळेंतील अभ्यासक्रमाची विभागणी ८ इयत्तांमधून करण्यांत येत होती. स्थानिक परिस्थितींत ज्याप्रमाणें बदल होईल, त्याप्रमाणें अभ्यासाची विभागणी करण्याची पद्धति पण बदलावी लागेल.



ह्या प्रश्नाचें ऐतिहासिक स्वरूप समजून घेण्यासाठीं नीटपणें संशोधन केल्यावर कांहीं चमत्कारिक गोष्टी दिसून आल्या. मुलांची इयत्तावार विभागणीचा प्रथा 'एक-शिक्षकी' शाळांनीं शहरापासून उचललेली दिसते. असें करण्यामध्यें योजना करणाऱ्यांचा हेतु स्तुत्य होता. त्यांना शिक्षकांना करावें लागणारें काम कमी करावयाचें होतें. त्यांना वाटलें कीं, ह्या योगें शिक्षकावर पडणारा भार हलका होईल, परंतु अनुभव मात्र उलट आला. ह्या योजनेमुळें शिक्षकाचें काम बेसुमार वाढलें.

ह्या बाबतींत मिस् वॉफोर्ड नांवाच्या बाईनें लिहिलेल्या 'छोट्या शाळेंतील शिक्षण' (Teaching in Small Schools) पुस्तकांत वेगवेगळे अनुभव नमूद केले आहेत. १८९० च्या सुमारास जीं मुलें शाळेंत दाखल होत, त्यांचें शाळेंतील स्थान ठरवितांना त्यांचें वाचन कसें आहे तें पाहिलें जात असे. त्यांच्या वाचनशक्तीवरून त्यांचा दर्जा ठरविला जात असे. मुलगा आपली प्रगति सांगतांना म्हणायचा, " मी तिसऱ्या रीडरमध्यें ( क्रमिक पुस्तक ) आहें. किंवा ५ व्या रीडरमध्यें आहें. " ह्या सुमारास ग्रामीण व नागरी विभागासाठीं

समान पुस्तकें व विद्यार्थ्यांची विभागणी करण्याची समान पद्धति प्रचारांत आली.

परंतु ही विद्यार्थ्यांची विभागणी करण्याची पद्धति खेड्यामध्यें प्रारंभापासूनच अपयशी ठरली. शहरी शाळेंत मुलांची संख्या पुष्कळ असल्यामुळें तेथें ती पद्धति चांगली ठरली. ह्याविषयीं लिहितांना मि. हॅरिस नांवाच्या गृहस्थानें पुढील उद्‌गार काढले आहेतः—माझ्या मतें शहरी शाळांप्रमाणें ग्रामीण शाळांतून विद्यार्थ्यांची विभागणी करणें अत्यंत घातुक आहे. हें करणाऱ्या लोकांना असें वाटतें कीं, जें शहराला मानवतें तेंच खेड्यांना पण मानवेल; परंतु ही समजूत चुकीची आहे.

वरीलप्रमाणें कांहीं लोकांनीं ह्या योजनेला जरी विरोध केला असला तरी १९१० सालाच्या सुमारास असें आढळून आलें कीं, शहरी पद्धतीबरच ग्रामीण शाळांतील इयत्तांची विभागणी करण्यांत आली व शहरांसाठीं आंखण्यांत आलेला अभ्यासक्रमच खेड्यांतील शाळांसाठीं मुक्रर करण्यांत आला. ह्याचा परिणाम असा झाला कीं, ह्या 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाला अनेक आपत्तींना तोंड द्यावें लागलें. शाळेचें काम ८ ते ९ महिने चाले आणि ह्या काळांत त्या शिक्षकाला भिन्न वयांच्या मुलांना (६ ते १८) भिन्न भिन्न विषय क, ख, ग, पासून तों इतिहासापर्यंत शिकवावे लागले. शिक्षकाचें काम सबंध दिवसभर चाले. त्याला ऐकण्याचेंच काम



जास्त करावें लागे. त्याचें शिकवणें अत्यंत कंटाळवाणें होई. इयत्तापद्धति आल्यापासून अशा शाळांचा प्रश्न अधिकच बिकट व गुंतागुंतीचा झाला. त्यांच्या अडचणी खूपच वाढल्या.

वर उल्लेखिलेल्या कु. बॉफोर्ड ह्यांचें पुस्तक काळजीपूर्वक वाचलें, तर आपणांला आढळून येईल कीं 'इयत्ता' शब्दाची कल्पनाच नागरी आहे. ह्या इयत्ता 'एक-शिक्षकी' शाळांवर लादणें ही एक मूलभूत चुकीची गोष्ट होती. 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाच्या आपत्ति, त्याला शिकवाव्या लागणाऱ्या पुष्कळशा इयत्ता व निरनिराळे विषय, ह्यांच्या पायींच जन्माला आल्या. ह्यामुळें जर ही इयत्ता पद्धति काढून टाकतां आली, तर तें अधिक चांगलें होईल. अशा घटनेला विरोध न करतां तिचा आनंदानें स्वीकार केला जावा. ह्या प्रकारची विचारसरणी दिवसेंदिवस जोरानें प्रसृत व्हायला लागल्यामुळें शिक्षकांना व जनतेला इयत्तांचें एकीकरण करण्याची कल्पना अधिक मानवूं लागली.

वर ह्या प्रश्नाबाबत अमेरिकेमध्यें चाललेल्या घडामोडीविषयींची संपूर्ण हकीकत दिली आहे. ती वाचून कोणाच्याही ध्यानांत येईल कीं, भारतांतील 'एक शिक्षकी' शाळांच्या हिताच्या दृष्टीनें जर आपण विचार केला तर, 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाला शिकवाव्या लागणाऱ्या इयत्तांची संख्या निम्मी करणें जरूरीचें आहे व तसें करण्यासाठीं इयत्तांचें एकीकरण करणें पण अपरिहार्य आहे. ह्या सूचनेची

अंमलबजावणी करतांना एक अडचण उभी राहण्याचा संभव राहील. एकाद्या मुलाला शाळेचें वर्ष चालू असतांना ही शाळा सोडून, ज्या ठिकाणीं सर्व इयत्ता चालू आहेत अशा मोठ्या शाळेंत जावें लागलें तर त्याला त्रास होईल.

## अधिक वर्ग शिकविणें

[ २ ] ह्या बाबतींत दुसरी एक सूचना आहे. ती पहिल्या सूचनेच्या मानानें कमी अतिरेकीपणाची वाटेल. शाळेंत असतील त्या इयत्ता तशाच ठेवाव्यात व शिक्षकानें एकापेक्षां अधिक इयत्तांना शिकवावें. ह्या सूचनेमुळें वर उल्लेखिलेल्या कारभारविषयक अडचणी उद्भवत नाहींत. शाळेचें वर्ष चालू असतांना मध्येंच एकाद्या मुलाला 'एक-शिक्षकी' शाळा सोडून मोठ्या शाळेंत जावें लागलें तरी त्याला त्रास होत नाहीं; त्यामुळें जुन्या विचारांच्या पालकांचा पण ह्या योजनेला विरोध राहूं शकत नाहीं. ह्या इयत्ता आहेत तशा जरी ठेवल्या तरी शिक्षकाला, कांहीं ठराविक विषय शिकवितांना एकापेक्षां अधिक वर्गांचे विद्यार्थी एकत्र आणणें शक्य होतें.

अशा प्रकारें एकापेक्षां अधिक वर्गांना एकेवेळीं शिकविण्याची पद्धति ऑस्ट्रेलियांत फार चांगल्या प्रकारें अंमलांत आणलेली दिसते. टॅसमेनियांत छोट्या ग्रामीण शाळांचा अभ्यासक्रमच असा आंखला आहे कीं, त्यामुळें कांहीं विशिष्ट विषयांसाठीं वेगवेगळ्या इयत्तांचे विद्यार्थी एके ठिकाणीं आणणें सहजसाध्य होतें. प्रत्येक इयत्तेचें वाचन,



स्पेलिंग, गणित व शिवण-काम स्वतंत्रपणें शिकविलें जातें; परंतु शारीरिक शिक्षण, धार्मिक शिक्षण गाणें व नीतिपाठ ह्या विषयांसाठीं सर्व विद्यार्थ्यांना एकत्र आणण्यांत येतें. चित्रकला, हस्त-व्यवसाय, सृष्टिशास्त्र, हे विषय शिकविण्यासाठीं विद्यार्थ्यांचे दोन गट पाडले जातात; तर भाषा, कविता, इतिहास, भूगोल व भूमितीसाठीं विद्यार्थ्यांचे तीन विभाग पाडले जातात.

दक्षिण ऑस्ट्रेलियांत, स्पेलिंग, लेखन, अंकगणित व हस्त-व्यवसाय, हे विषय सर्व इयत्तांना स्वतंत्रपणें शिकविले जातात; तर शारीरिक शिक्षण, संगीत, सृष्टिशास्त्र, शिवण-काम व नीतिपाठ शिकविण्यासाठीं, सर्व इयत्तांना एकत्र आणतात. वाचन शिकवितांना शाळेंतील विद्यार्थ्यांची पांच गटांतून विभागणी होते. भूगोल शिकवितांना तीनच गट असतात. त्याचप्रमाणें भाषा व कविता शिकवितांना तीन गट असतात. परंतु चित्रकला, इतिहास व व्याकरण शिकवितांना दोनच गट असतात. व्हिक्टोरिया प्रांतांत अंकगणित व स्पेलिंग प्रत्येक इयत्तेच्या विद्यार्थ्याला स्वतंत्रपणें शिकविलें जातें; तर संगीताच्या वेळीं सर्व शाळा एकत्र आणण्यांत येते. स्पष्ट बोलायला शिकविण्यासाठीं शाळेचे दोन गट पाडण्यांत येतात. त्याचप्रमाणें आरोग्य, शारीरिक शिक्षण, हे विषय शिकवितांना पण विद्यार्थ्यांचे दोनच गट पाडले जातात. लेखन, कविता, व्याकरण, सृष्टिशास्त्र, सायन्स, हस्तव्यवसाय,

गृहशास्त्र, इतिहास, भूगोल, नागरिकशास्त्र इत्यादि विषय शिकविण्यासाठीं तीन गट पाडण्यांत येतात; तर कला व लेखन [ कॉंपोझिशन ] हे शिकविण्यासाठीं चार व वाचन शिकविण्यासाठीं पांच गट पाडतात. न्यू साउथ वेल्स ह्या प्रांतांत सबंध ग्रामीण शाळा दोन भागांत विभागली जाते. प्रत्येक विभागांतील प्रत्येक वर्ग, इंग्रजी व गणित हे विषय, स्वतंत्रपणें शिकतो. प्रत्येक विभागांतील वर्ग सृष्टिशास्त्र, इतिहास, कला, हस्तव्यवसाय, संगीत, आरोग्यशास्त्र व धार्मिक ज्ञान शिकविण्यासाठीं एकत्र आणतात; तर सबंध शाळा सहली, बोलपट पाहणें, शारीरिक शिक्षण व नीतिपाठ हे विषय शिकण्यासाठीं एकत्र करण्यांत येते. ऑस्ट्रेलियांतील सर्व प्रदेश-राज्यांमधून हें जाहीर करण्यांत आलें आहे कीं, ही जी वर्गांची विभागणी [ अथवा गट करण्याची योजना ] सुचविण्यांत आली आहे. ती अगदीं काटेकोरपणें पाळली पाहिजे असा आग्रह नाहीं. सरकारी शिक्षण खात्यांकडून आलेल्या सूचना मार्गदर्शक म्हणून मानल्या जाव्यात व स्थानिक परिस्थितीप्रमाणें, त्यांची अंमलबजावणी करतांना जरूर ते फेरबदल केले जावेत, असें सांगण्यांत आलें आहे; इतकेंच नव्हे तर असे फेरबदल करण्यासाठीं शाळांना उत्तेजन बण देण्यांत येतें.

ह्या प्रकारची पद्धति आपल्या देशांत स्वीकारतां येणें शक्य आहे. प्रत्येक प्रदेश-राज्यानें आपणांला सोयीची होईल अशी तपशीलवार योजना ह्या बाबतींत आंखावी. हे काम केवळ प्राथमिक शिक्षकाकडे सोंपवून चालणार नाहीं. त्यांना त्या बाबतींत आवश्यक ती दृष्टि असणार नाहीं व [प्रारंभींच्या अवस्थेंत ] ह्या कामाला लागणारी कुवतसुद्धां त्यांच्या जवळ आढळणार नाहीं. ह्यासाठीं मार्गदर्शनाचें काम अधिक जाणत्या लोकांकडून व्हायला पाहिजे. विश्वविद्यालयांचे संशोधन विभाग, शिक्षणखात्याचे वरिष्ठ अधिकारी किंवा तत्सम तज्ज्ञ मंडळींना पुढाकार घेऊन ही आंखणी करून घ्यावी लागेल. एकदां ही कल्पना प्रचारांत आली व ती सर्वसाधारण लोकांकडून हाताळली गेली कीं, कांहीं प्राथमिक शिक्षकांना आपल्या दैनंदिन अनुभवाच्या आधारावर मौलिक सूचना देतां येतील व त्यामुळें काम चांगल्या प्रकारें वाढीला लागेल. आपल्या 'एक-शिक्षकी' शाळांचा मगदूर सुधारण्यासाठीं वर उल्लेखिलेली मोलाची सूचना भारतानें पडताळून पाहण्यासारखी आहे.

**वर्गनायक पद्धति**—'एक-शिक्षकी' शाळांचा मगदूर सुधारण्यासाठीं आणखी एक गोष्ट करतां येण्यासारखी आहे. ती म्हणजे आपली पूर्वींची वर्गनायक पद्धति जिवंत करणें. ही पद्धति जुन्या स्वरूपांतच आज आपणांस स्वीकारतां येणार नाहीं. ह्या पद्धतीचा स्वीकार कोणत्या स्वरूपांत करावा ह्याला महत्त्व नाहीं. आजच्या बदलत्या परिस्थितींत ज्या स्वरूपांत तिचा स्वीकार करतां येण्यासारखा असेल त्या स्वरूपांत ती

स्वीकारली जावी. ही पद्धति मूळची आपली आहे. आपल्यासारख्या दरिद्री, ग्रामीण, शेती-प्रधान देशाला ही पद्धति चांगलीच मानवेल. आपण ही पद्धति पश्चिमेकडील देशांना दिली. इंग्लंडसारख्या औद्योगिक, सुसंपन्न अशा देशाकडून दडपण आल्यामुळें आपण ही पद्धति टाकून दिली. ही आपली फार मोठी चूक झाली. आपण ही चूक सुधारली पाहिजे. ह्या वर्गनायक पद्धतीचा पुन्हा आपलेपणानें स्वीकार केला पाहिजे; कारण त्यामुळें आपल्या 'एक-शिक्षकी' शाळा, आज आहेत त्यांपेक्षां, खूपच चांगल्या होण्याचा संभव आहे.

मागें सांगितल्याप्रमाणें ही पद्धति, ऑस्ट्रेलियांत आज प्रचलित आहे. ह्या पद्धतीच्या अंमलबजावणींत ह्या देशाला आलेले अनुभव खूपच उत्साहवर्धक असे आहेत. ह्या पद्धतीची नीट पाहणी व्हिक्टोरिया व न्यू साउथ वेल्स ह्या दोन प्रांतांमध्यें मि. ब्रेथवेट ( शाळाखात्याचे तपासणी अधिकारी ) व मि. मॅकरॉय ( सिडने ट्रेनिंग कॉलेजचे प्राध्यापक ) ह्यांनीं केली व त्यांनीं खालील दोन मुख्य मुद्दे विचारासाठीं पुढें मांडले.

( १ ) ह्या पद्धतीकडे पाहण्याची शिक्षकाची दृष्टि कोणती असते ?

( २ ) ह्या पद्धतीचा विद्यार्थ्यांवर चांगला किंवा वाईट परिणाम कसकसा होतो ?

त्यांच्या पाहणींत असें आढळून आलें कीं, न्यू साउथ वेल्समधील बहुसंख्य शाळांतून वर्गनायक नेमलेले होते, परंतु त्यांना



पुढील प्रकारचीं कामें दिलीं होतीं. मुलांच्या दौती भरणें, शाळांच्या भिंतीवर चांगलीं चित्रें अथवा सुविचार लिहिणें, क्रीडांगण साफ ठेवणें, पाट्या, पुस्तकें व इतर पाठाचें साहित्य आणून ठेवणें इत्यादि. ह्या वर्गनायकांना उत्तम रीतीनें मार्गदर्शन करणारा असा फक्त एकच उत्साही शिक्षक त्यांना आढळला. तो म्हणाला, 'वर्गनायकाची जर मदत नसली तर 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाचे खूपच हाल होतील.' ह्या पद्धतीला व्हिक्टोरिया प्रांतांतील शिक्षकांनीं चांगलेंच उचलून धरलें होतें. ह्या बाबतींत वर उल्लेखिलेले अधिकारी लिहितात:—वर्गनायकांचा उपयोग करण्याच्या पद्धतीचा येथील बहुसंख्य शिक्षक मोठ्या उत्साहानें पाठपुरावा करतात. कांहीं शिक्षकांना मात्र वाईट वाटतें कीं, हें काम करावें लागल्यामुळें त्या वर्गनायकाचा थोडासा वेळ खर्ची पडतो व त्याचा अभ्यास राहतो. परंतु हें होणें अपरिहार्य आहे, असें ते पण कबूल करतात. त्यांचीं मतें त्यांच्या पुढील विधानांवरून सहज समजण्यासारखीं आहेत.

'वर्गनायकांच्या मदतीवांचून ह्या असल्या शाळा चालवितां येणें अशक्यच आहे.'

'ह्यांचीं मदत 'एक-शिक्षकी' शाळा कार्यक्षमतेनें चालविण्यासाठीं आवश्यकच आहे.'

'ज्या 'एक-शिक्षकी' शाळांमध्यें सर्व इयत्ता आहेत, त्या ठिकाणीं वर्गनायकांचा उपयोग करून घेतलाच पाहिजे.'

दुसऱ्या बाबतींत पण त्यांना असें आढळून आलें कीं, ही वर्गनायक पद्धति जशी शिक्षकांच्या फायद्याची आहे, तशी ती, विद्यार्थ्यांच्या पण हिताची आहे. ज्यांना म्हणून व्हिक्टोरियांतील 'एक-शिक्षकी' शाळा पाहण्याची संधि लाभली असेल, त्यांच्या मनावर तेथील शाळांतून प्रचलित असलेल्या वर्गनायक पद्धतीचें काम पाहून चांगलाच परिणाम झाला असेल. ह्या योजनेमुळें शिक्षकाला जास्त काम करतां येतें व जें काम तो करतो तें अधिक चांगल्या प्रकारचें करूं शकतो. ह्या वर्गनायकाची जर मदत घेतली नाहीं तर त्याच्या कामाचा व्याप वाढेल, त्याचा मगदूर मात्र कमी होईल. ह्या योजनेमुळें छोट्या छोट्या मुलांना मार्गदर्शन मिळतें. तें जर मिळालें नाहीं तर त्यांचा खूप वेळ फुकट जातो. ह्या योजनेमुळें छोट्या शाळेंतील मुलांमध्यें सहकार्याची भावना वाढीला लागते. सर्व विद्यार्थी, एकाद्या मोठ्या संघटनेचे भागीदार ज्याप्रमाणें एकमेकांच्या खांद्याला खांदा भिडवून काम करतात, त्याप्रमाणें काम करीत असलेले दिसतात. असें दृश्य इतर शाळांत पाहण्यास मिळत नाहीं. ह्या बाबतींत व्हिक्टोरिया प्रांतांतील कांहीं लोकांचे पुढील अनुभव आपणांस उद्बोधक वाटतील.

'९ ते १४ वयाचीं ग्रामीण मुलें पहिल्या व दुसऱ्या इयत्तेसाठीं भिंतीवर लावण्याचे तक्ते आपल्या फुरसतीच्या वेळीं मोठ्या आवडीनें करीत असल्याचें दृश्य मीं पाहिलें.



शाळेच्या जवळपास राहणाऱ्या मुलांना संध्याकाळीं जवळ जवळ ढकलून घरीं पाठवावें लागतें. हीं मुलें आपलें वर्गनायकाचें काम करण्यासाठीं लागणारें शैक्षणिक साहित्य तयार करण्याच्या नादांत एकदां गुंतलीं कीं, त्यांना वेळेचें पण भान राहत नाहीं !'

'ह्या वर्गनायक' पद्धतीमुळें विद्यार्थ्यांमध्यें बंधुभावाची वाढ होते. मोठे मुलगे व मुली लहान मुलांशीं प्रेमानें वागतात. त्यांना दमदाटी व धाकदपटशापेक्षां दुसऱ्याची समजूत घालून त्यांच्याशीं सहानुभूतीनें वागण्याचें महत्त्व समजून घेतात. लहान मुलांचे आपल्या अडचणी सोडवून घेण्यासाठीं आपल्या वडील भावांबहिणींवर विसंबून राहण्याचा विश्वास वाढूं लागतो.

ह्या वर्गनायक पद्धतीमुळें विद्यार्थ्यांच्या मनांत परहितनिष्ठा उत्पन्न होऊं शकते. आपण सर्वजण एका सहकारी कुटुंबाचे घटक आहोंत, ही जी श्रद्धा सर्वांच्या मनामध्यें वाढीला लागणें जरुरीचें आहे तिचीं बीजें ह्या वर्गनायक पद्धतीमुळें मुलांच्या मनामध्यें चांगल्या रीतीनें रुजतात. ह्या शाळेंतील विद्यार्थी आधीं शिकतो; नंतर शिकवितो. ह्या काळांत तो आज्ञाधारकपणा शिकतो. ह्याच गुणाच्या जोरावर कोणाला न दुखवितां तो दुसऱ्यांना हुकुम देऊं शकतो. त्याची हुकुम देण्याची पद्धति गोड, दुसऱ्याचें मन वळविणारी व उपयुक्त काम करवून घेणारी अशी तयार होते. ज्यावेळीं तो शाळा

सोडतो, त्यावेळीं आपण एका पिढीला शिक्षण घ्यायला मदत केली अशा समाधानानें तो बाहेर पडतो.

जरी त्याला या गोष्टीची जाणीव झाली नसली तरी त्यानें एका पिढीला शिक्षण घ्यायला मदत केली ही सत्य परिस्थिति आहे व ती कुणालाही नाकारतां येणार नाहीं. त्यानें जें साधलें तें त्याच्या आकलनशक्तीच्या बाहेर आहे. आपण काय केलें ह्याची जाणीव नसतांना त्यांनीं खूप मोठें काम केलेलें आहे.'

वरील उद्गारांवरून हें लक्षांत येईल कीं, ज्या शिक्षकांनीं हें लिहिलें त्यांनीं आपल्या विद्यार्थ्यांविषयीं भावनापूर्ण अंतः-करणानें हें लिहिलें आहे. आमचें असें मत आहे कीं, पुरेसा पुरावा जवळ असल्यामुळेंच इतके भावनापूर्ण उद्गार त्या शिक्षकांनीं काढले.

ह्यावरून हें सहज लक्षांत येईल कीं, ही वर्गनायकपद्धति जशी शिक्षकांच्या हिताची आहे, तशीच ती विद्यार्थ्यांच्या पण हिताची आहे. अतएव ह्या पद्धतीचें पुनरुज्जीवन करण्याचें भारतानें ठरविल्यास त्या मार्गांत एकही अडचण आतां पुढें येतां कामा नये.

ह्या वर्गनायपद्धतीविषयींच्या वेगवेगळ्या प्रश्नांचा विचार करावा लागेल. वर्गनायकांची निवड करणें, त्यांना मार्ग-दर्शन देणें, त्यांच्याकडे सोंपवून देण्याच्या कामाचें निश्चित स्वरूप व त्याच्या मर्यादा ठरविणें आणि त्यांच्या कामावर योग्य ती देखरेख ठेवणें, इत्यादि गोष्टींकडे नीट लक्ष पुरवावें लागेल. ह्या बाबतींत व्हिक्टोरिया प्रांतांतील अनुभव पुढें एका परिशिष्टांत दिले आहेत.

वेळापत्रक–'एक शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाला आपलें वेळापत्रक चांगलें तयार करणें फार कठीण वाटतें. वेळापत्रक तयार करणें ही एक शालेय जीवनांतील कठीण अशी समस्या आहे. ज्या शाळेंत प्रत्येक इयत्तेसाठीं एक स्वतंत्र शिक्षक आहे, त्यांनाही वेळापत्रक तयार करणें जड जातें. 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाला तर हें काम फार बिकट वाटतें. प्रत्येक वर्गासाठीं योग्य तेवढा वेळ त्याला द्यावा लागतो. प्रत्येक वर्गाला शाळेचे तास चालू असतांना पुरेसें काम द्यावें लागतें. प्रत्येक विषयाकडे लक्ष देऊन, तो विषय शिकविण्यासाठीं लागणारा जरूर तेवढा वेळ देण्याची तरतूद करावी लागते. एका वेळीं एकापेक्षां अधिक वर्ग एकत्र घेतल्यामुळें वेळापत्रकाला धक्का लागणार नाहीं, ह्याची पण त्या शिक्षकाला खबरदारी घ्यावी लागते. [शाळेंत शिक्षक एकच असल्यामुळें त्याला पुष्कळदां एकापेक्षां अधिक वर्गांना एकत्रित करून शिकवावें लागतें.] वेळापत्रकांत अमुक तासाला अमुक विषय शिकविला जाईल एवढेंच न दाख-वितां, त्या तासाला शिकविण्याची व्यवस्था कशी केली जाईल, त्याचा पण निर्देश करावा लागतो. ह्या शाळेंत सर्वच तासाच्या वेळीं सर्व मुलांना शिक्षकाला स्वतःला शिकवितां

येणें शक्य नसत. त्यामुळें वेळापत्रक तयार करतांना कोणते तास शिक्षक स्वत: घेणार, कोणते वर्गनायक घेणार व कोणत्या तासाला विद्यार्थी स्वत:च आपापलीं कामें करणार, ह्याचा निर्देश करावा लागतो. अतएव ह्या शाळेंत काम करणाऱ्या शिक्षकांना, आपलें वेळापत्रक शास्त्रीय पद्धतीनें व बिनचूक कसें करावें, ह्याचें शिक्षण देणें जरूर आहे.

दुवक्त पद्धति:—' एक-शिक्षकी ' शाळेंत एकाच वेळीं शिक्षकाला सांभाळाव्या लागणाऱ्या वर्गांची संख्या कमी करण्याचा दुसरा एक मार्ग, म्हणजे शाळेंत दुवक्त पद्धति सुरू करणें. ज्या शाळेंत शिक्षकाला चारच इयत्ता शिकवाव्या लागतात, तेथें जर ही पद्धति लागू केली तर त्या शिक्षकाला एका वेळीं दोनच वर्ग सांभाळावे लागतील, म्हणजे त्याचें काम बरेंच सोपें होईल. अशा रीतीनें निम्मा वेळच मुलांना बोलविल्यामुळें, त्या मुलांचें शिक्षण कमी होतें का, ह्याचा नीट तपास करणें जरूर आहे. सबंध दिवसभर चारी इयत्तांना एकत्र शिक्षण देण्यापेक्षां निम्म्या मुलांना सकाळीं व बाकीच्यांना दुपारीं बोलविलें म्हणजे प्रत्येक वेळीं दोन दोनच वर्ग घेतले तर त्यांचा अभ्यास कमी होतो कीं जास्त होतो, ह्याचें संशोधन होणें जरुरीचें आहे. ह्या दोन्ही पद्धतींपैकीं कोणत्याही पद्धतीनें जरी विद्यार्थी शिकले तरी त्यांच्या प्रगतींत फारसा फरक पडणार नाहीं असें वाटतें. दुवक्त पद्धति जर सुरू केली तर त्यामुळें शिक्षकाचें काम थोडें हलकें होतें,



हा त्या पद्धतीपासून होणारा फायदा आपण लक्षांत घेतला पाहिजे. आपण लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ' एक-शिक्षकी ' शाळेंतील मुलांची संख्या ही स्थानिक परिस्थितीप्रमाणें कमीजास्त असणार. १५ ते २० पासून ५० ते ६० पर्यंत ही संख्या असेल; किंवा ३०—३५ च्या सुमारास असेल त्या ठिकाणीं दुवक्त पद्धति फार उपयुक्त ठरेल; इतकेंच नव्हे तर ती अपरिहार्य म्हणून तिचा स्वीकार करावा लागेल.

वैयक्तिक शिक्षण देणें:—ह्या खेरीज 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाला दुसऱ्याही नव्या पद्धति स्वीकारतां येतील. वेगवेगळ्या इयत्ता व वेगवेगळे विषय ह्याच्या चक्र-व्यूहांतून बाहेर पडून प्रत्येक विद्यार्थ्याला त्याच्या प्रगती-प्रमाणें शिक्षण देतां येईल. शाळेंतील मुलांची संख्या जर १५ ते २० एवढीच असेल तर त्याला दुवक्तपद्धति न करतां हें काम नीट रीतीनें करतां येईल. पूर्वीच्या आपल्या पाठशाळांतून ह्याच पद्धतीनें शिक्षण दिलें जात असे. आपल्या कांहीं छोट्या छोट्या ' एक-शिक्षकी ' शाळांतून ही पद्धति कां स्वीकारली जात नाहीं त्याचें कारण कांहीं समजत नाहीं.

दुसरी एक पद्धति म्हणजे सर्व शाळेला एकाच वेळीं एकाद्या व्यवसायाच्यामागें लावणें. ह्या पद्धतींत शिक्षक विषय व इयत्ता ह्यांचें दडपण बाजूला ठेवतो व शाळेंतील सर्व मुलांना एकाद्या उपयुक्त व्यवसायामार्फत शिक्षण देण्याचा

प्रयत्न करतो. ह्या बाबतींत स्वित्झर्लंडमध्यें करण्यांत आलेल्या एका उपयुक्त उपक्रमाची हकिकत पुढें दिली आहे.

१९३८ सालच्या सप्टेंबर महिन्यांतील गोष्ट. पाँट द पियर नांवाची एक ' एक-शिक्षकी ' शाळा होती. ६ ते १४ वर्षें वयाची ३०--३५ मुलें (मुलगे व मुली) ह्या ठिकाणीं काम करीत होतीं. ह्या शाळेंतील शिक्षक एक तरुण उत्साही व कल्पक असा गृहस्थ होता. वर्गांत चाललेलें काम पाहून कोणाचीही खात्री झाली असती कीं, येथील शिक्षणांत तोच तोपणा मुळींच नाहीं. मुलांनीं कांहीं तक्ते व नकाशे केले होते. वर्तमान हकिकतीबद्दलची माहिती देणाऱ्या छोट्या पुस्तिका तयार केल्या होत्या. चित्रें काढलीं होतीं. एका कोंपऱ्यांत सृष्टिज्ञान देणाऱ्या वस्तूंचा छोटासा पदार्थसंग्रहालय होता. तर दुसऱ्या कोंपऱ्यांत त्यांचें ग्रंथालय होतें; तर तिसऱ्या कोंपऱ्यांत त्यांच्या राष्ट्रांत ज्या ज्या वस्तु तयार होतात, त्यांचे नमुने ठेविले होते. ज्या वेळीं प्रस्तुत हकिकत लिहिणाऱ्या लेखकानें ह्या वर्गाला भेट दिली, त्यावेळीं, पांचव्या इयत्तेंतील दोन मुलें, भिंतीजवळ उभें राहून, ते काढीत असलेल्या एका नकाशाबद्दल चर्चा करीत होतीं. त्यांच्याशीं बोलतांना पुढील गोष्टी नजरेस आल्या.

" १९३९ सालीं झुरिच शहरांत एक राष्ट्रीय प्रदर्शन भरणार होतें. हें प्रदर्शन दर २५ वर्षांनीं भरत असतें. हें प्रदर्शन पाहण्यासाठीं आपली सहल नेण्याची योजना ह्या



शाळेंतील विद्यार्थी आंखीत होते. पहिल्या दुसऱ्या इयत्तेच्या विद्यार्थ्यांखेरीज, बाकीचे सर्व विद्यार्थी ह्या सहलीमध्यें भाग घेणार होते. ह्या विद्यार्थ्यांपैकीं जे मोठे होते ते ह्या सहलीबाबतच्या महत्त्वाच्या प्रश्नांचा विचार करण्यांत गुंतले होते. रस्त्यानें जातांना आपणांस कोणकोणते डोंगर पाहतां येतील, प्रदर्शनांत कोणत्या गोष्टी विशेष पाहिल्या पाहिजेत, सबंध सहलीला दिवस किती लागतील, ह्या वेळेची चांगल्याप्रकारें विभागणी कशी करतां येईल, सहलीला खर्च किती येईल, वाटेनें जातांना कोणकोणत्या भिन्न भाषिकांशीं संबंध येईल, इत्यादि प्रश्नांचा विचार हीं मुलें करीत होतीं. पांचवींतील मुलें आपणांस कोणकोणत्या वाहतुकीच्या साधनांचा उपयोग करावा लागेल व एकूण अंतरापैकीं किती अंतर पायीं चालतां येईल, ह्याचा विचार करीत होतीं. हीं मुलें ग्रामीण विभागांतील होतीं. त्यांच्यापैकीं कोणीही बसमध्यें, होडीमध्यें अथवा जलद धांवणाऱ्या आगगाडीमध्यें बसलेले नव्हते. त्यामुळें ह्या सहलींत जास्तीत जास्त वेगवेगळ्या प्रकारच्या वाहनांचा उपयोग कसा करतां येईल, ह्याचा आढावा घेण्याच्या प्रयत्न व ह्या सहलीपासून जास्तीत जास्त अनुभव आनंद कसा मिळेल, ह्याचा विचार हीं मुलें करीत होतीं. त्यांनीं ठरविलें कीं, आरंभीं गांवांतून निघतांना आपण

पायीं निघूं, म्हणजे कांहीं अंतरापर्यंत छोटीं मुलें पण आपल्या बरोबर चालतील. नंतर एक खिंड चढून गेल्यावर, एका सरोवरापर्यंत जाणाऱ्या एका आगगाडींत बसूं. तेथें उतरल्यावर आपण होडीनें पुढें जाऊं. पलीकडे उतरल्यावर, थोडेसें चालून एक खिंड उतरली कीं बसमध्यें बसून आपण झुरिचला जाऊं. परतीचा मार्ग त्यांनीं निराळा ठरविला होता. ह्या प्रवासाला लागणाऱ्या वेळेची व पैशांची तर त्यांना कल्पना होतीच, परंतु ह्या पैशांत बचत कशी करतां येईल ह्याचा पण तीं मुलें विचार करीत होतीं. आपणांस ज्या ज्या विभागांतून जावयाचें आहे, त्या त्या विभागांचा इतिहास तीं शिकूं लागलीं. त्या ठिकाणीं राहणारे लोक पूर्वीं कोणत्या पद्धतीचा पोषाख करीत होते व त्यांच्या बोलभाषा कोणत्या होत्या, ह्याची पण त्यांनीं माहिती मिळविली होती. त्यांनीं स्वित्झर्लंडमधील निरनिराळ्या लोकांच्या वेषभूषेबद्दल माहिती देणारीं जीं चित्रें गोळा केलीं होतीं, तीं फारच प्रेक्षणीय अशीं होतीं. झुरिचमध्यें हीं मुलें एका शहरीं शाळेंत राहणार होतीं. ह्या शाळेला उन्हाळ्याची सुट्टी असल्यामुळें ही शाळा वास्तविक बंद राहणार होती, परंतु हीं मुलें तेथें जाणार असल्यामुळें ती शाळा, त्यांच्यासाठीं खुली राहणार होती. ह्या सर्व माहितीवरून लक्षांत येईल कीं, ह्या एका सहलीमधून अभ्यासक्रमांतील किती तरी निरनिराळे विषय शिकविण्याची तरतूद करण्यांत आली होती. सबंध वर्षभर शिक-



वितां येईल इतका अभ्यासक्रम शिक्षकाजवळ तयार होता. 'ह्या प्रवासांत म्हणण्यासाठीं कांहीं गाणीं तुम्हीं पाठ केलीं आहेत कां?' असा प्रश्न विचारतांच मुलांनीं शिक्षकाकडे पाहिलें. त्यांनीं 'म्हणा' असें सांगतांच व गाण्याचा आरंभ करून देतांच, सर्व मुलांनीं एक सांघिक गीत म्हणून दाखविलें."

अशा प्रकारें शाळेंतील सर्व मुलांना एकाद्या व्यवसायांत अथवा योजनेमध्यें गुंतवून ठेवण्याची पद्धति, अमेरिकेंत विशेषच फैलावली आहे. ह्या योजनेला इंग्रजींत (Perpendicular Unit) ह्या नांवानें ओळखण्यांत येतें.

ज्या शाळेंत आठ इयत्ता व एक शिक्षक आहे, तेथें हे असे प्रयोग यशस्वी होतात. भारतामधील 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाला चारपांचच इयत्ता शिकवाव्या लागतात. त्याला हें काम करणें कठीण नाहीं. दुर्दैवानें आपण ह्या असल्या प्रयोगांकडे द्यावें तेवढें लक्ष दिलेलें नाहीं.

अभ्यासक्रमः—'एक-शिक्षकी' शाळांची सुधारणा करण्यासाठीं वेगवेगळ्या शैक्षणिक योजनांची व साधनांची आपण चर्चा केली. ह्यावेळीं आणखी एका महत्त्वाच्या मुद्याचा पण विचार करणें जरूर आहे. ह्या 'एक-शिक्षकी' शाळांसाठीं वेगळा अभ्यासक्रम असावा कां? आपल्या भारतामध्यें ह्या प्रश्नाचा फारसा विचार झालेला नाहीं. ह्या बाबतींत केलेला उल्लेखनीय उपक्रम मुंबई सरकारचा आहे. १९४० सालीं त्यांनीं 'एक-शिक्षकी' शाळांसाठीं सोपा केलेला

एक अभ्यासक्रम प्रसिद्ध केला. हा अभ्यासक्रम करतांना तो सोपा करून 'एक-शिक्षकी' शाळेच्या शिक्षकाच्या आवाक्यांत त्याला कसा आणतां येईल, एवढाच दृष्टिकोन सरकारनें पुढें ठेविला होता. हा अभ्यासक्रम व्यवहारांत आणून त्याचा चांगला उपयोग 'एक-शिक्षकी' शाळांनीं करून घेतल्याचें आढळत नाहीं. येथील शिक्षक आपल्या जुन्याच अभ्यासक्रमाला चिकटून राहिले. हा एवढा अपवाद सोडल्यास, भारतांतील बहुसंख्य प्रदेश-राज्यांमध्यें जो अभ्यासक्रम आंखलेला आहे तो सर्वसाधारणपणें नागरी शाळांकरितांच आंखलेला आहे. ह्या अभ्यासक्रमाचा आपल्या मगदुराप्रमाणें वापर करण्याची केविलवाणी धडपड आमच्या ग्रामीण विभागांतील 'एक शिक्षकी' शाळांतील शिक्षक करीत असल्याचें दृश्य आपणांस पाहण्यास सांपडतें.

नागरी विभागासाठीं व ग्रामीण विभागांसाठीं एकच अभ्यासक्रम ठेवण्यांत दोन दोष आहेत. पहिली गोष्ट म्हणजे नागरी शाळांच्या मानानें ग्रामीण शाळांच्या खूपच अडचणी असतात. दुसरी गोष्ट म्हणजे नागरी शाळेंतील मुलें शाळेंत वक्तशीर व नियमित हजर राहतात; त्या मानानें ग्रामीण शाळांतील मुलांची हजेरी फारच कमी पडते व असते ती पण अनियमित असते. त्यामुळें एका वर्षांत नागरी शाळांतील मुलांची जेवढी प्रगति होईल तेवढी प्रगति ग्रामीण शाळांतील मुलांची झाली पाहिजे असा आग्रह धरणें चुकीचें आहे.



एक-शिक्षकी शाळांतील शिक्षकांची शैक्षणिक पातळी विशेष मोठी नसते. त्यांचा अनुभव तोकडा असतो. त्यामुळें त्यांच्यामध्यें सर्वसाधारण अभ्यासक्रमांत कोणता व कसा बदल करावयाचा हें जाणण्याची व तसें करण्याची पात्रता नसते. ह्या ग्रामीण शाळांतील शिक्षकांसाठीं स्वतंत्र व सविस्तर असा अभ्यासक्रम आंखला जावा, असें शिक्षणशास्त्रज्ञांना आतां वाटूं लागलें आहे. अशा प्रकारें त्यांच्यासाठीं स्वतंत्र अभ्यासक्रम आंखणें जर अशक्य असेल तर, आहे तो अभ्यासक्रम ग्रामीण विभागांत शिकवितांना त्यामध्यें कसकसा फेरबदल करावा ह्याविषयीं सविस्तर सूचना येथील शिक्षकांना देणें जरूरीचें आहे. भारतालासुद्धां ह्या दोन्हींपैकीं एकतरी सूचना स्वीकारावी लागेल. पहिलीच सूचना (ग्रामीण विभागासाठीं स्वतंत्र अभ्यासक्रम आंखण्याची) भारतानें स्वीकारली तर तें अधिक चांगलें होईल.

ह्यानंतर पुढचा प्रश्न असा उद्भवतो कीं, ह्या 'एक-शिक्षकी' शाळांसाठीं जो अभ्यासक्रम आंखावयाचा त्याचें स्वरूप कसें असावें? ह्या प्रश्नाचें उत्तर एकदम द्यावयाचें झालें तर असें म्हणतां येईल कीं, तो अभ्यासक्रम छोटा असावा व सोपा असावा. परंतु भोंवतालचे विचारप्रवाह लक्षांत घेतले तर आपणांस असें आढळून येईल कीं, अभ्यासक्रम सोपा करण्यास तज्ज्ञांचा विरोध आहे. ते म्हणतात—जर तम्ही ह्या शाळांसाठीं सोपा अभ्यासक्रम दिला तर त्यामुळें

ग्रामीण शाळांचें महत्त्व कमी होईल. 'एक-शिक्षकी' शाळांचा दर्जा कमी असतो, असा सर्वांचा समज होईल. त्यामुळें ग्रामीण मुलें हीं नेहमीं मागेंच राहतील. शैक्षणिक क्षेत्रांत सर्वांना समान संधि देण्याच्या तत्त्वाला त्यामुळें बाध येईल. ह्या बाबतींत ऑस्ट्रेलियाकडे नजर टाकणें जरूर आहे. ह्या देशानें असें ठरवून टेविलें आहे कीं, कोणताही मुलगा त्यांचें प्रारंभींचें शिक्षण छोट्या ग्रामीण शाळेंत झालें आहे, ह्या सबबीवर शिक्षणांत मागासलेला राहतां कामा नये. अतएव ग्रामीण शाळांतील शिक्षण देण्याच्या तंत्रामध्यें शक्य तितक्या सुधारणा करण्याचा सारखा प्रयत्न तेथें चाललेला असतो. हेतु हा कीं, ग्रामीण विभागांतील मुलांची प्रगति नागरी विभागांतील मुलांच्या प्रगतिएवढीच व्हावी. ऑस्ट्रेलियानें ह्यामुळें ग्रामीण शाळांसाठीं स्वतंत्र व सोपा असा अभ्यासक्रम आंखलेला नाहीं. ह्या योजनेमागील हेतु स्तुत्य लोकशाही स्वरूपाचा आहे. भारतामध्येंसुद्धां 'एक-शिक्षकी' व बहुशिक्षकी शाळेसाठीं एकच अभ्यासक्रम असणें योग्य होईल.

ह्या दोन्ही शाळांतील अभ्यासक्रमाचा आशय जरी एक राहिला तरी त्या अभ्यासक्रमाची आंखणी व तो अंमलांत आणण्याची पद्धति ह्यामध्यें दोन प्रकारच्या शाळांमध्यें फरक दिसून आल्याबांचून राहणार नाहीं. 'एक शिक्षकी' शाळेंत मुलांना शिकविण्यासाठीं इयत्तांचें एकीकरण करणें, निरानेराळ्या इयत्तांच्या



विद्यार्थ्यांना कांहीं विषय एकत्रित करून शिकविणें, इत्यादि तंत्रांचा उपयोग 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकांना करावा लागतो. त्यामुळें ह्या शाळांतून सदर अभ्यासक्रम शिकवितांना ह्याची आंखणी निराळ्या रीतीनें करावी लागेल. ह्या अभ्यासक्रमाला अनुरूप असे जे फेरबदल करावे लागतील ते जास्त परिणामकारक होण्यासाठीं विशेष तांत्रिक सल्ल्याची गरज भासेल. हें काम केवळ शिक्षकांवर सोंपवून चालणार नाहीं. खास लायकी असणाऱ्या तज्ज्ञाकडे हें काम सोंपवावें लागेल. अमेरिकेमध्यें व ऑस्ट्रेलियामध्यें अशी एक प्रथा आहे कीं, 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकांसाठीं खास 'मार्गदर्शिका' तयार करण्यांत येतात. शिक्षकाला ही मार्गदर्शिका आपल्या खिशांत बाळगतां येते. ह्या पुस्तिकेंत त्याला आपल्या खास गरजा पुऱ्या पाडण्यासाठीं, आपल्या अभ्यासक्रमांत कसा बदल करतां येईल, ह्याविषयीं अगदीं सविस्तर सूचना देण्यांत येतात. ह्या पुस्तिकांमध्यें ह्या अभ्यासक्रमांत फेरबदल करण्यासाठीं कांहीं ठराविक नियम दिलेले नसतात. ह्या अभ्यासक्रमांमध्यें कसकसे फेरबदल करतां येणें शक्य आहे त्याची माहिती देणारे वेगवेगळे पर्याय त्यांत दिलेले असतात. शिक्षकाला आपल्या मगदुराप्रमाणें त्यांत फेरबदल किंवा कमी जास्त करण्याची मुभा असते. अशा प्रकारच्या मार्गदर्शकांचा अभाव भारतामध्यें फार तीव्रतेनें भासतो. ज्यावेळीं आपण आपल्या ग्रामीण शिक्षणाची पुनर्घटना करण्याचा प्रयत्न करूं,

त्यावेळीं अशा मार्गदर्शिका आपणांला काढाव्या लागतील व त्यांमधून शिक्षकांना सविस्तर व व्यावहारिक स्वरूपाच्या सूचना द्याव्या लागतील.

'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकांनीं भिन्न भिन्न विषय कसे शिकवावेत, ह्या विषयीं पण त्यांना तपशीलवार सूचना द्याव्या लावतील. वर केलेलें विवेचन तितकेसें तपशीलवार नाहीं. गृहपाठ, मूकवाचन, पालक-शिक्षकांचें सहकार्य, अभ्यासक्रमेतर प्रवृत्ति इत्यादि ज्या बाबींशीं 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकांचा संबंध येतो त्यांची चर्चा येथें झाली नाहीं. ह्या सर्व गोष्टी बहुशिक्षकी शाळांतून ज्या पद्धतीनें हाताळल्या जातात, त्याच पद्धतीनें त्या गोष्टींचा वापर 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाला करून चालणार नाहीं. वर ज्या मुद्यांचा विचार केला तो विचार करण्यापूर्वीं त्या मागील वैचारिक भूमिका किंवा तत्त्वच सांगण्याचा प्रयत्न झाला. तपशिलांत शिरून सर्व पद्धतींची सांगोपांग चर्चा करतां आली नाहीं. हें पुस्तक शिक्षणक्षेत्रांत कार्य करणाऱ्या अधिकाऱ्यांना व शिक्षणविषयक प्रश्नांचा विचार करणाऱ्या शिक्षकांना उद्देशून लिहिलें आहे. त्यामुळें त्यांत अधिक तपशीलवार विवेचन आलेलें नाहीं. वर ऑस्ट्रेलिया व अमेरिका ह्या दोन देशांनीं, आपला अभ्यासक्रम 'एक-शिक्षकी' शाळेला अनुरूप करून घेण्यासाठीं, जे प्रयत्न केले त्यांची माहिती देण्यांत आली आहे. ह्यावरून वाचकांच्या लक्षांत येईल कीं,



ह्या पुढारलेल्या देशांनासुद्धां 'एक-शिक्षकी' शाळांतील प्रश्नांचा अभ्यासपूर्वक विचार करावा लागला. ह्या देशांतील छोट्या शाळांपुढें कोणकोणते प्रश्न उभे राहिले व ते त्यांनीं कसे सोडविले हें वरील विवेचनावरून सहज लक्षांत येईल.

———

# उपसंहार

मागील दोन प्रकरणांवरून 'एक-शिक्षकी' शाळेचे कारभारविषयक व शिक्षणविषयक प्रश्न किती महत्त्वाचे पण गुंतागुंतीचे आहेत ह्याची कल्पना वाचकांना आली असेल. हे प्रश्न जर समाधानकारक रीतीनें सोडवावयाचे असतील तर ज्या ज्या संस्थांची व संघटनांची हे प्रश्न सोडवायला मदत होणार असेल त्या सर्वांचा ह्या कामीं उपयोग करून घेण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. ह्या बाबतींत विश्वविद्यालयांनीं पुढाकार घेतला पाहिजे. त्यांनीं कर्तबगार शिक्षकांच्या नेतृत्वाखालीं प्रायोगिक 'एक-शिक्षकी' शाळा चालविल्या पाहिजेत. त्याठिकाणीं शिकविण्याच्या वेगवेगळ्या पद्धति पडताळून पाहिल्या पाहिजेत. ह्या शाळांचा कारभार सुव्यवस्थित चालण्यासाठीं निरनिराळे प्रयोगही करून पाहिले पाहिजेत व आपणांस येणारे अनुभव जाहीर केले पाहिजेत. दिल्ली येथें जी मध्यवर्ति शिक्षणसंस्था (Central Institution of Education) आहे, त्या संस्थेनें ह्या बाबतींत पुष्कळशी जबाबदारी स्वीकारली पाहिजे. ह्या देशांतील भिन्न भिन्न ठिकाणीं शिक्षणविषयक प्रयोग केले जावेत, ह्यासाठीं ह्या संस्थेनें पुढाकार घेऊन मार्गदर्शन केलें पाहिजे व अशा प्रकारें जे प्रयोग करण्यांत येतील त्यांचे एकत्रीकरण करण्याचा प्रयत्न पण



ह्या संस्थेनें केला पाहिजे. ह्यासाठीं दिल्लीजवळील उपनगरांत त्या संस्थेनें प्रयोगादाखल कांहीं 'एक-शिक्षकी' शाळा चालविल्या पाहिजेत. ह्याचप्रमाणें सरकारनें चालविलेल्या ट्रेनिंग कॉलेजांनीं काम केलें पाहिजे. ज्या ज्या ठिकाणीं शक्य असेल त्या त्या ठिकाणीं त्यांनीं आपल्या 'एक-शिक्षकी शाळा चालविल्या पाहिजेत व ह्या शाळांतून वेगवेगळ्या योजना व शिकविण्याच्या पद्धति ह्यांचा वापर करून पाहिला पाहिजे. प्राथमिक शिक्षकांसाठीं जीं ट्रेनिंग कॉलेजें चालतात त्यांनीं आपणांस पाठ घेण्यास सोयीचें पडावें म्हणून एकतरी स्वतःची अशी 'एक-शिक्षकी' शाळा चालविली पाहिजे.

हें सर्व करून सुद्धां आपलें काम पूर्ण होणार नाहीं. ट्रेनिंग कॉलेजला जोडून जी शाळा चालविण्यांत येते त्या शाळेंत शिकविण्याची नवीन तंत्रें पडताळून पाहण्यास वाव मिळत नाहीं; कारण त्या ठिकाणीं शिकाऊ शिक्षकांच्या पाठांची एवढी गर्दी झालेली असते कीं, बाकी कांहीं करायला तेथें कोणास फुरसतच मिळत नाहीं. प्रायोगिक शाळा ही असल्या शाळेपासून भिन्न असते. ही शाळा एका विशिष्ट हेतूनें चालविण्यांत येते. आपणांस प्रयोग करण्यास योग्य असें वातावरण तेथें ठेवावें लागतें व त्या वातावरणांत वेगवेगळे प्रयोग करण्यांत येतात. प्राथमिक शिक्षकांच्या प्रत्येक ट्रेनिंग कॉलेजला अशी प्रायोगिक शाळा चालवितां येईलच असे नाहीं; परंतु ह्या संस्थांपैकीं कांहीं संस्थांमध्ये कांहीं जावा

शिक्षक नेमले जावेत व त्यांच्यामार्फत अशा प्रकारचे प्रयोग केले जावेत.

प्रायोगिक ' एक-शिक्षकी ' शाळा चालविण्याच्या कामीं खाजगी संस्थांना पण श्री. सैय्यदिन ह्यांनीं सुचविल्याप्रमाणें, मोलाचें कार्य करतां येईल, परंतु देशाच्या आजच्या परिस्थितींत हा ' एक-शिक्षकी ' शाळांचा प्रश्न संपूर्णतः खाजगी संस्थांकडे सोंपविणें धोक्याचें आहे. ह्या बाबतींत योजनाबद्ध सर्वव्यापी असा कार्यक्रम धडाडीनें आंखणें जरूर आहे व तें कार्य प्रदेश सरकारांकडूनच होईल. पंचवार्षिक योजनेमध्यें सर्वांना मार्गदर्शक होतील अशा योजना आंखण्याला वाव आहे. अशा प्रकारच्या योजना आंखून आपल्या देशाच्या शैक्षणिक कार्यक्रमाला नवी दिशा दाखविण्याचा प्रयत्न करण्याचें ह्या पंचवार्षिक योजनेनें ठरविलें आहे. ' एक-शिक्षकी ' शाळा ह्या आपल्या देशांतील तीन लाख खेड्यांची शैक्षणिक गरज पुऱ्या पाडणार आहेत. अतएव त्यांचें राष्ट्रीय महत्त्व लक्षांत घेऊन आपल्या देशाच्या पुनर्रचनेच्या कार्यक्रमांत त्यांना महत्त्वाचें स्थान मिळालें पाहिजे; तसेंच ह्या संस्थांना हरएक प्रकारची आर्थिक मदत प्रदेश सरकारांकडून व मध्यवर्ति सरकारकडून मिळाली पाहिजे.

प्रायोगिक ' एक-शिक्षकी ' शाळांची, ह्या शाळांमधील शिक्षणविषयक प्रश्न सोडवायला चांगलीच मदत होईल, परंतु त्या शाळांचे कारभारविषयक जे प्रश्न आहेत, ते सोडविण्यास शिक्षणखात्याची मदत लागेल. ह्यासाठीं निरनिराळ्या प्रकारची पाहणी करावी लागेल; नवीं तंत्रें तपासून पाहावीं लागतील; ह्या शाळांचा कारभार चांगला चालण्यासाठीं कांहीं नवे नियम व नव्या प्रथा घालून द्याव्या लागतील. ह्या गोष्टी अगदीं साध्या व सोप्या आहेत. प्रत्येक प्रदेश सरकारच्या शिक्षणखात्यानें ह्या क्षेत्रांत थोडे प्रयोग केले कीं त्यांना योग्य असे निर्णय घेणें सोयीचें होईल.



ह्या क्षेत्रांत जें संशोधन होईल व जे प्रयोग होतील त्यामुळें ह्या विषयासंबंधीं भरपूर लिखाण प्रसिद्ध होईल. हें नवीन साहित्य सर्वांना खूपच मार्गदर्शक होईल. तें पूर्णपणें वास्तव असें होईल; कारण तें स्थानिक परिस्थिति लक्षांत घेऊन आपण केलेल्या प्रयोगांच्या अनुभवावर आधारलेलें असेल. आज ह्या विषयावरील बरेचसें साहित्य, परकीय पुस्तकांचें भाषांतरवजा अशा प्रकारचें असतें. त्या ठिकाणीं करण्यांत आलेले प्रयोग अगदीं भिन्न अशा वातावरणांत केलेले असतात. त्यामुळें आपणांला त्यांचा व्हावा तसा उपयोग होत नाहीं. आपल्या देशांत जें साहित्य, ह्या विषयावर येथून पुढें निर्माण होईल, तें सर्व प्रादेशिक भाषांमधून तयार केलें जाईल. मध्यवर्ति शिक्षण संस्थेनें अशा प्रसिद्ध झालेल्या लिखाणाचा गोषवारा तयार करून तो इतर प्रदेश राज्यांच्या अथवा परदेशांच्या उपयोगासाठीं पाठविण्याची व्यवस्था करावी. अशा प्रकारचें साहित्य उपलब्ध झालें कीं, ' एक-

शिक्षकी ' शाळांतील शिक्षक ते वाचूं शकतील व त्यामुळें त्यांची कार्यक्षमता वाढेल व ह्या शाळांचा मगदूर सुधारण्या-साठीं त्याची मोलाची मदत होईल. त्यामुळें ' एक-शिक्षकी' शाळांची सर्वांगीण सुधारणा होण्यासाठीं प्रभावी असें अनु-कूल वातावरण निर्माण होईल व त्यामुळें ह्या शाळांची आपोआप सुधारणा होईल.

भारतांत खेडीं खूप आहेत, इतकेंच नव्हे तर तीं फारच विखुरलेलीं आहेत. त्यांतील लोकवस्ती अगदीं विरळ आहे. ह्या खेड्यांचा एकीकरणाला तीव्र विरोध आहे. ह्यामुळें आपल्या पांच लाख खेड्यांपैकीं निम्म्या खेड्यांतून 'एक-शिक्षकी' शाळांमार्फतच लोकांना सुसंस्कृत करण्याचें कार्य होणार आहे. अतएव आपल्या देशाच्या शैक्षणिक पुनर्रचनेच्या कार्यक्रमांत ह्या शाळांना अग्रस्थान दिलें गेलें पाहिजे व त्या शाळांच्या अडीअडचणींचा अगदीं बारकाईनें व काळजीपूर्वक विचार केला पाहिजे.

' एक-शिक्षकी ' शाळांचीं मुळें आमच्या देशांत खूप खोलवर रुतलेलीं आहेत. त्यांनीं भूतकाळीं ह्या देशाच्या संस्कृतिवर्धनाच्या कार्यक्रमांत फार महत्त्वाची कामगिरी केली आहे. आपली शैक्षणिक परंपरा त्यांनीं हजारों वर्षें चांगल्याप्रकारें सांभाळली आहे. अशा ह्या ' एक-शिक्षकी ' शाळांकडे आमच्या देशांतील शिक्षणखात्यांनीं आपल्या आयुष्याच्या पहिल्या ६५ वर्षांत खूप दुर्लक्ष केलें, ही



दुःखाची व दुर्दैवाची गोष्ट आहे. ह्या संस्थाकडे पाहण्याची जेव्हां ह्या खात्यांना बुद्धि सुचली तेव्हां त्यांनीं ह्या शाळां-विरुद्ध जोराचें युद्ध पुकारून त्यांचा बीमोड करण्याचें ठर-विलें. ह्या शाळा कुचकामी आहेत व त्यांच्यामुळें पैशाची उधळपट्टी होते अशी हांकाटी त्यांनीं सुरू केली. एका दृष्टीनें ह्या शिक्षणखात्यांचें लक्ष नव्हतें तें बरें होतें. त्यांनीं लक्ष दिलें तें ह्या शाळांचा नायनाट करण्यासाठीं दिलें. बेडकांना राजा हवा होता. पहिला देवानें दिलेला लाकडी ठोकळा त्यांना आवडला नाहीं. मग आला तो करकोचा. त्यानें बेडकांना स्वाहा करावयाला सुरवात केली. बेडकांना पुन्हां पूर्वींचा ठोकळा मागण्याची पाळी आली. तसाच कांहींसा प्रकार झाला. ग्रामीण शाळांना सरकारला सांगावें लागलें कीं, आमच्याकडे मुळींच लक्ष देऊं नका; पण आम्हांला शांतपणें जगूं द्या; परंतु ह्या शाळांमागें लागलेलें ग्रहण लवकरच सुटलें. स्वातंत्र्याची पहाट उगवली. ढगा-आड लपलेला सूर्य बाहेर आला. लोकमतानुवर्ती मंत्रि-मंडळें कारभार करूं लागलीं व ' एक-शिक्षकी ' शाळांच्या मागें लागलेला सरकारचा ससेमिरा सुटला. ह्या शाळांना केवळ जगण्याचा हक्क मिळाला नाहीं, तर त्यांना एक मानाचें स्थान मिळालें. ज्ञानाची उजळती मशाल देशाच्या कानाकोपऱ्यांत घेऊन जाणारी एक महत्त्वाची संस्था म्हणून ' एक-शिक्षकी ' शाळेला मान्यता मिळाली.

स्वातंत्र्य जरी आलें तरी जुन्या बेड्या कांहीं संपूर्णपणें तुटल्या गेल्या नाहींत. जुन्या विचारसरणीचे कांहीं लोक आहेतच. त्यांना ह्या 'एक-शिक्षकी' शाळांची संख्या सारखी वाढत असल्याचें पाहून कसेंसेंच होतें. कांहीं लोक 'एक-शिक्षकी' शाळाकडे एक अपरिहार्य आपत्ति म्हणून पाहतात. शिक्षण-क्षेत्रांतील आमचें संशोधन आतां पाळण्याबाहेर पडूं लागलें आहे, हें जरी खरें असलें तरी तें नागरी प्रश्नांमध्यें इतकें गुरफटलेलें आहे कीं, खेड्यापर्यंत चालत जाऊन 'एक-शिक्षकी' शाळांची तोंडओळख करून घ्यायला ह्याला किती काळ लागेल कोण जाणे! दरम्यानच्या काळांत हा गरीब 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षक वेगवेगळ्या अडीअडचणींशीं झुंजत कसा बसा जगून आपलें काम करीत आहे. दारिद्र्य, अपुरें शिक्षण तुटपुंजें ट्रेनिंग (कधीं त्याचा संपूर्ण अभाव) असमाधानकारक देखरेख, पुस्तकांची व साहित्याची पूर्ण दुर्मिळता, ह्या सर्व गोष्टींमुळें ह्या बिचाऱ्या 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकां-पुढें जमलेल्या भुकेलेल्या मेंदूंच्या तोंडांत ज्ञानाचा घास-घालणें अशक्य होतें.

ही केविलवाणी परिस्थिति शक्य तितक्या लवकर थांब-विण्याची वेळ आतां आली आहे. आमच्या अधिकाऱ्यांचा, शिक्षकांचा व शिक्षणतज्ज्ञांचा शिक्षणाकडे पाहण्याचा नागरी दृष्टिकोन बदलला पाहिजे. त्यांची खात्री पटवून दिली पाहिजे कीं, 'एक-शिक्षकी' शाळा ही कांहीं आपत्ति नाहीं. त्यांनीं



जाणून घेतलें पाहिजे कीं, 'एक-शिक्षकी' शाळा हें आपणांला एक आव्हान आहे. तशीच ती एक काम करण्याला संधि आहे. ह्या शाळांची चांगल्याप्रकारें वाढ झाली पाहिजे, कारण ह्या संस्थांमध्यें आपला नवा शिक्षणक्रम यशस्वी होण्याचीं कांहीं चांगलीं बीजें आहेत.

ह्यानंतर दुसरी गोष्ट म्हणजे जगांतील सर्व देशांतून विशेषत: ऑस्ट्रेलिया, अमेरिका व स्वीडन ह्या देशांतून जें संशोधन व प्रायोगिक कार्य 'एक-शिक्षकी' शाळांबाबत झालेलें आहे, त्यांचा सखोल अभ्यास करणें जरुरीचें आहे. त्यांच्या अनुभवांवरून आपणांस खूप नव्या नव्या कल्पना सुचतील.

तिसरी गोष्ट म्हणजे ह्या प्रश्नाची आखल भारतीय स्वरू-पाची पाहणी करणें व आपल्या देशांतील सर्वांचे अनुभव एकत्रित करणें.

ह्या प्रश्नाबाबत संशोधन करण्याचें व प्रयोग करण्याचें काम विश्वविद्यालयांनीं व खाजगी संस्थांनीं करायला पाहिजे. ह्यामुळें ह्या क्षेत्रांत नवचैतन्य उत्पन्न होईल. नवनवें साहित्य निर्माण होईल. त्यामुळें 'एक-शिक्षकी' शाळेंतील शिक्षकाची कार्यक्षमता वाढेल. त्याचें खरें स्वरूप दिसून येईल व हजारो खेड्यांमध्यें नवजीवन निर्माण करण्याचें पुण्य-कार्य त्याला करतां येईल.

## परिशिष्ट १ लें

व्हिक्टोरियांत ( ऑस्ट्रेलिया ) वर्गनायकांचा उपयोग कसा केला जातो ?

व्हिक्टोरियामधील शिक्षक वर्गनायकांचा उपयोग दोन प्रकारें करून घेतात. हे वर्गनायक शिक्षकाचे मदतनीस म्हणून काम करतात. शाई, कागद, पेन्सिली वेळच्या वेळीं वर्गाला पुरविणें, शाळांच्या भिंतींची सजावट करणें, क्रीडांगणावर देखरेख ठेवणें व तत्सम कामें करणें हें वर्गनायकांचें एक महत्त्वाचें कर्तव्य असतें. अशा प्रकारच्या वर्गनायकांची खरोखरच जरूरी असते; अतएव ही योजना स्वागतार्ह आहे.

दुसऱ्या प्रकारचा जो वर्गनायक असतो, तो जवळजवळ बदली शिक्षकासारखाच असतो. व्हिक्टोरियामधील मुख्य शिक्षक ह्या वर्गनायकांचे दोन भाग पाडतात. एकाला वर्गनायक म्हणतात. त्यांचें काम आपल्या स्वतःच्या वर्गातील मुलांचें वाचन घेणें, शुद्धलेखन करवून घेणें, परवचा, कोष्टकें ह्यासारखें पाठांतर करवून घेणें हें असतें. दुसरा जो असतो तो शिक्षक-वर्गनायक असतो. त्याला आपला वर्ग सोडून इतर वर्गांमध्यें, विशेषतः खालच्या वर्गामध्यें जीं मुलें अभ्यासांत मागें आहेत, त्यांना मदत करण्याचें काम करावें लागतें.

ह्या वर्गनायकाच्या अंगीं कांहीं विशेष गुण असावे लागतात. शिक्षकाची भूमिका नीटपणें वठविण्याची ताकद त्याच्यामध्यें असावी लागते. ह्या मुलाजवळ बुद्धिमत्ता व



ज्ञान अधिक असलें पाहिजे. त्याबरोबरच सहानुभूति व उत्साह पण त्याच्याजवळ भरपूर असायला पाहिजे. दुसऱ्याचें लक्ष ओढून घेणें व त्याला कामांत गुंतवून ठेवणें, ह्याही कला त्याला माहीत असल्या पाहिजेत. मुलांना योग्य प्रश्न विचारण्याची व त्यांच्या उत्तरांचा चांगला उपयोग करण्याची हातोटी पण त्यांच्याजवळ असली पाहिजे. यशस्वी शिक्षकाचे हे गुण त्याच्याजवळ असले पाहिजेत.

कोणत्याही मुख्याध्यापकाला आपल्या शाळेंत अशा जन्मजात शिक्षकांची तुकडी, सहजासहजीं मिळणार नाहीं. त्याला वेळ खर्चून अशा वर्गनायकांना खास शिक्षण द्यावें लागेल. शिक्षकांच्याकडून ह्या वर्गनायकांबाबत पुढील उद्गार ऐकायला मिळतातः—

" वर्गनायकांना जर ट्रेनिंग ( मार्गदर्शन ) मिळालें नाहीं तर त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं."

" वर्गात जाऊन पुढें काय करावयाचें आहे व तें कसें करावयाचें हें वर्गनायकांना नीट समजावून सांगावें लागतें."

येथील मुख्याध्यापक आदर्श पाठ देतात. पेन्सिल, कागद घेऊन वर्गनायक हे पाठ पाहायला बसतात. वाचन घेतांना कोणत्या दोषांकडे लक्ष द्यावयाचें, तें मुख्याध्यापक ह्यांना समजावून देतात. शुद्धलेखनाचा पाठ कसा घ्यावा, अंकगणितांत मुलें ज्या चुका करतात, त्यांचीं कारणें कशीं शोधावीं हें सर्व मुलांना समजावून सांगण्यांत येतें. कांहीं

वर्गनायक मग स्वतः पाठ घेतात. त्यांचे मित्र त्या पाठांवर चर्चा करतात. शाळेच्या पूर्वी व मधल्या रजेंत हे वर्गनायक मुख्याध्यापकांना भेटतात व आपणांला जो पाठ घ्यावयाचा असेल त्याबाबत त्यांच्याशीं चर्चा करतात. दर आठवड्याला हे मुख्याध्यापक शिक्षकांची सभा घेतात. ह्या सभेंत पुढील आठवड्यांत वर्गनायकांकडे कोणतें काम दिलें जाणार आहे, त्याची ते कल्पना देतात व त्या बाबतींत जरूर ती मदत करतात. वाटेल तेव्हां ह्या वर्गनायकांना बोलावून कामाला जुंपलें जात नाहीं. वेळापत्रकाला जोडून ह्यांच्या कामाचें पण एक वेळापत्रक केलें जातें. त्यामुळें प्रत्येक वर्गनायकाला आपणास केव्हां काय करावें लागेल व कशाची आपण तयारी केली पाहिजे, ह्याची नीट कल्पना असते.

प्रत्यक्ष वर्ग चालविण्याच्या कामीं वर्गनायकाची मदत दोन प्रकारें घेतली जाते. ते आपल्या वर्गांतील पुनःपठणाचें काम पाहूं शकतात, किंवा खालच्या वर्गातील मुलांना मदत करतात. ह्या खालच्या वर्गाकडे पाहण्यासाठीं वर्गनायकाची खूप मदत लागते. खालच्या दोन इयत्तांमधील मुलांवर देखरेख ठेवण्याची व त्यांना मार्गदर्शन करण्याची फार गरज असते. व्हिक्टोरियामधील पुष्कळशा शाळांतून हे खालचे दोन वर्ग, ज्यावेळीं मुख्याध्यापकांच्या ताब्यांत नसतात, तेव्हां ते वर्गनायकांच्याकडे सोंपविलेले असतात.

ह्या वर्गनायकांकडे किती वेगवेगळीं कामें सोंपविण्यांत



येतात, हें पुढील दोन शाळांकडून ह्या बाबत आलेल्या माहिती-वरून समजेलः—

(१) खालच्या वर्गांत अंक शिकविणें.

(२) सबंध शाळेचें वाचन घेणें.

(३) सबंध शाळेचें शुद्धलेखन व स्पेलिंग घेणें.

(४) कविता म्हणवून घेणें.

(५) खालच्या वर्गांत लहान मुलांच्या गोष्टी ऐकून घेणें.

(६) पहिल्या व दुसऱ्या इयत्तांचें लेखन घेणें.

(७) पहिल्या व दुसऱ्या इयत्तांतील हस्तव्यवसाय घेणें.

(८) तिसरी ते आठवी इयत्तेपर्यंतच्या मुलांच्या इतिहास-भूगोलाच्या पाठांची उजळणी घेणें.

दुसऱ्या शाळेंत वर्गनायकांकडे पुढील कामें सोंपविण्यांत आलीं होतीं:—

इयत्ता:—१ ली व २ री—सर्व विषय शिकविणें.

इयत्ता:—३ री, ४ थी—स्पेलिंग, कोष्टकें, कविता, वाचन व चित्रकला घेणें.

इयत्ता:—५ ते ८—वाचन, शुद्धलेखन, कविता, इतिहास, भूगोल, नागरिकशास्त्र ह्या विषयांची उजळणी करून घेणें.

वरील माहितीवरून असें दिसून येईल कीं, जर शिक्षकांना इतके सर्व विषय, वर्गनायकांकडे बिनधोकपणें सोंपवितां आले तर एका शिक्षकाला आठ इयत्ता शिकविणें कठीण जाणार नाहीं.

वरील विवेचनावरून आपल्या लक्षांत आलें असेल कीं, चांगले मुख्याध्यापक आपल्या वर्गनायकांची काळजीपूर्वक निवड करतात. त्यांना योग्य मार्गदर्शन करतात. त्यांच्याकडे सोंपविल्या जाणाऱ्या कामाची नीट काळजीपूर्वक योजना आंखतात. इतकेंच नव्हे तर त्यांना लागणारें सर्व नैतिक बळ पण देतात. आपल्या वर्गांत जाऊन आपलें काम सुरू करण्यापूर्वी त्याचें काम नीट मार्गाला लावून देतात. वर्ग सुटण्यापूर्वी त्यांच्या वर्गांत जाऊन त्यांनीं काम कसें केलें तें पारखून घेण्याचा प्रयत्न करतात. ह्या मुख्याध्यापकांची नजर सर्व शाळेवर असते व प्रत्येक वर्गाच्या नाडीवर जणूं त्यांचा हात असतो. ह्यामुळें शिकणाऱ्या मुलांना व शिकविणाऱ्या वर्गनायकांना जाणीव असते कीं, आपल्या सर्व कामाकडे शिक्षकाचें लक्ष आहे व चांगलें अगर वाईट काम त्यांच्या लक्षांत येणार आहे. ह्या बाबतींत एका शिक्षकानें पुढील उद्गार काढले आहेतः—दुसऱ्या वर्गांत शिकवीत असतांना मुख्याध्यापकांनीं ह्या वर्गनायकांच्या कामाकडे लक्ष दिलें पाहिजे. तासाच्या शेवटीं कोणत्याही वर्गनायकाच्या कामाची चांचणी झाल्याशिवाय राहतां कामा नये. वर्गनायकाच्या ताब्यांतील वर्गाला केव्हांही असें वाटूं नये कीं, आपल्या वर्गाकडे शिक्षकाचें लक्ष नाहीं.

———